# माणसाला हवं तरी काय?

जगदीश काबरे

दिलीप प्रकाशन
गिरगाव, मुंबई ४

प्रकाशक :
दिलीप वामन काळे
१७३, राजा राममोहन रॉय मार्ग,
गिरगांव, मुंबई ४०० ००४.

अक्षर जुळणी :
मायक्रोग्राफ
मुंबई ४०० ००४. दू. ध्व. ३८८४७३०

मुखपृष्ठ : सतीश भावसार

प्रथमावृत्ती : २६ जून १९९४



मूल्य रु. ४५/-

मुद्रक :
सौ. शामला अनंत चिंचणीकर
माधुरी मुद्रण
४४३, शिवाजी नगर,
पुणे ४११ ००९.

*प्रिय मित्र*
*आणि सुहृद*
*निरंजन घाटे*
*लक्ष्मण लोंढे*
*आणि*
*सुबोध जावडेकर*
*यांना —*

## अनुक्रम



## अतिथी

तो बर्फाळलेल्या समुद्रातून सरपटत चालला होता. किती तास तो असा सरपटला हे त्याचं तोच जाणे. जेव्हा त्याच्या विमानाला अपघात झाला, तेव्हा तो विमानाबाहेर फेकला गेला. जमिनीलगतच अपघात झाल्यामुळं तो जरी बाहेर फेकला गेला आणि बर्फाळ जमिनीवर आदळला, तरी त्याचा डावा पाय मोडण्यापलीकडं आणि मुका मार लागण्यापलीकडं फारशी इजा त्याला पोहोचली नव्हती. अर्थातच शुद्धीवर आल्यानंतरच त्याच्या हे सगळं लक्षात हळूहळू आलं होतं. त्याच्या डोक्यालाही थोडा मार लागला असावा. कारण त्याचं डोकं एवढं बधीर झालं होतं की, अपघात नेमका कशामुळं झाला हे काही त्याला आठवत नव्हतं.

उत्तर धृवावर कडाक्याची थंडी होती. जिकडेतिकडे बर्फाचे थर आणि बोचरे वारे वाहत होते. एवढ्या थंडीत प्राणी जिवंत राहणं जवळजवळ अशक्यच. त्याचे हातपाय हिमबाधेनं ग्रासले होते.

बोटं हलवताना फार त्रास होत होता. त्यातील संवेदनाच नष्ट झाल्यासारख्या त्याला वाटत होत्या. त्यानं मन एकाग्र केलं आणि वातावरणाच्या तपमानाचा अंदाज घेतला. साधारणपणं शुन्याखाली ४० अंश असावं ते.

त्याच्या चेहऱ्यावरही हिमबाधेने आपले प्रताप दाखवायला सुरुवात केली होती. त्यामुळं त्याचं अंगच एवढं बधीर झालं होतं की, आता बोचऱ्या वाऱ्याचाही त्याला त्रास होत नव्हता. जणू काही तोही एक गोठलेलाच पण जिवंत प्राणी होता. जीवनमरणाच्या सीमारेषेवरचा जिवंतपणा! त्याला याची जाणीव झाली आणि तो शहारलाचं.

काहीतरी त्वरित हालचाल केली पाहिजे याची त्याला तीव्रतेनं जाणीव झाली. पण पाय मोडल्यामुळं हलणं तर शक्यच नव्हतं. मग चालण्याची बातच सोडा. सरपटत, सरपटत पुढं सरकतानाही त्या थोड्याशा हालचालीमुळं मोडलेला पाय गारठणाऱ्या थंडीतही ठणका मारायचा. त्यामुळं त्याच्या सरपटण्यालाही मुंगीची चाल होती. सतत एकाच कुशीवर असल्यानं त्याच्या शरीराला रग लागली होती म्हणून तो उताणा पडला. तेवढ्याशा हालचालीनंही त्याच्या पायातून जोरदार कळ उठली.

समोरच्या उंचवट्यापर्यंत सरपटत जायचं. मग पुढं कसं जायचं ते ठरविता येईल. पण एकदा उंचवट्यावर गेल्यानतर निदान दूर अंतरावर तरी नजर पोहोचेल. आणि परिस्थितीचा तसाच परिसराचाही अंदाज घेता येईल. तेव्हा सध्या त्या उंचवट्यापर्यंत पोहोचणं हाच महत्त्वाचा उद्देश आहे. असा विचार करीत तो पुन्हा जीवाच्या करारानं सरपटू लागला. तो जसजसा उंचवट्याजवळ येऊ लागला. तसंतसं त्याच्या मनाला वाटू लागलं की, पुढं जिवंत राहण्याचा निश्चित काही तरी मार्ग सापडेल. असा विचार स्थिरावल्यावर त्याच्या मनाला उभारी आली. तो उत्साहानं पुन्हा सरपटू लागला. त्या उत्साहाच्या भरात त्याचं पायाचं दुखणंही तो विसरला. बोचऱ्या वाऱ्याचाही त्याला विसर पडला.

उंचवट्यावर पोहोचल्यावर त्यानं दूरवर नजर फिरवली. दूरदूरपर्यंत बर्फच पसरलेलं होतं. पण पलीकडचं वातावरण त्याला



थोडंसं सुखावह वाटलं. बर्फावरनं परावर्तित होणारी किरणं त्याच्या डोळ्यात शिरली; ती एवढी झगझगीतपणे की, त्याचे डोळे क्षणमात्र दिपले. त्यानं गपकन् डोळे मिटून घेतले. त्याच्या डोळ्यापुढं अंधारी आली. उत्साहाच्या भरात जलद गतीनं सरपटण्यामुळं त्याच्या अंगातलं त्राण नाहीसं झालं होतं. आणि क्षणकाळातच ग्लानी येऊन तो बेशुद्ध पडला.

त्या बर्फाळलेल्या भागात जॉन मासेमारी करत फिरत होता. आज तो मासेमारी करण्यासाठी त्याच्या घरापासून फारच दूर अंतरावर येऊन पोहोचला होता. माशांच्या शोधात तो उंचवट्याजवळ येऊन पोहोचला. त्याला अचानक एका माणसाचा पाय दिसला. त्याचे बूट हलताना दिसले. आणि क्षणभर तो घाबरलाच. तो त्याच्याकडं धावला. बेशुद्ध पडलेल्या माणसाजवळ पोहोचल्यावर जॉनला दिसलं की, हा आपल्यासारखा उत्तर ध्रुवीय माणूस नाहीय. हा कुठला तरी गोरा माणूस असावा.

पण जवळून निरखल्यावर त्याला जाणवलं की, हा गोरा माणूसही असणं शक्य नाही. त्याची कांती जरी गोरटेली असली तरी त्याचा चेहरा गोऱ्या माणसासारखा नव्हता. जॉनला निश्चित अंदाज करता येईना की, हा कोण आहे ते. जॉनचं लक्ष त्याच्या नाकाकडं गेलं. ते चपटं आणि बरंच रुंदही होतं. अशा प्रकारचं नाक कुठल्याही गोऱ्या माणसाचं त्यानं पाहिलं नव्हतं की पुस्तकातही असं चित्र त्याला दिसलं नव्हतं. आता जॉन कुतूहलानं त्या बेशुद्ध पडलेल्या माणसाचं निरीक्षण करू लागला. त्याला दिसलं की, त्याच्या नाकपुड्याही माणसासारख्या नाहीयत. ओठांपासून जवळजवळ तीन बोटं उंचीवर त्या होत्या आणि त्यावर सोनेरी रंगाची कातडी झाकण बसवल्यासारखी दिसत होती. जॉनला असंही आढळलं की, त्याची जिवणीही बरीच रुंद आहे. गोऱ्या माणसाच्या जिवणीपेक्षा जवळजवळ दीडपट रुंद! उंचीही अवाढव्य –दहा–बारा फूट! धिप्पाड शरीर! आणि चेहराही कलिंगडासारखा रुंद आणि वाटोळा! जरी याला माणसासारखे दोन हात आणि दोन पाय होते, तरी हा प्राणी काहीतरी वेगळाच होता. हा माणूस नव्हता

हे खास. असा विचार जॉनच्या मनात आल्याबरोबर तो अंगभर शहारला. हा कोणीतरी राक्षस किंवा यती असावा असं त्याला वाटलं अन् जॉनच्या अंगाला दरदरून घाम सुटला. थंडीतही तो थरथर कापायला लागला. यती-हिममानव याविषयीच्या त्यानं आख्यायिका भरपूर ऐकल्या होत्या. तो माणूसखाऊ आहे... माणसाला पळवून नेतो असं त्याच्या कानावर आलं होतं. जॉननं त्या बेशुद्ध पडलेल्या माणसासारख्या दिसणाऱ्या प्राण्याला त्याच्याजवळ असलेल्या सुऱ्यानं भोकसून ठार मारायचं ठरवलं. आपल्याकडं सुरा आहे ह्या जाणिवेनं त्याला थोडा धीर आला.

जॉन सुऱ्यावर आपल्या उजव्या हाताची पकड घट्ट करून त्याच्या आणखी जवळ गेला. आणि ओणवा होऊन त्याचं निरीक्षण करू लागला. त्याचे कान त्याला हत्तीच्या कानाच्या आकाराएवढे मोठे पण माणसाच्या कानासारखेच असलेले दिसले. त्याच्या हातापायाची बोटं पातळ परंतु लांबसडक होती - पेन्सिलीच्या लांबी एवढी. आणि प्रत्येक हाताला दोन अंगठे दिसले त्याला. हा विचित्र प्राणी पाहून आता जॉनला भीतीऐवजी आश्चर्य वाटू लागलं होतं. त्याच्या चेहऱ्यावर व हातापायांना हिमबाधा झालेली असल्यामुळं त्याच्या चामडीचा रंग नेमका कोणता असावा याबद्दल त्याला मात्र निश्चितपणे अंदाज करता आला नाही.

तो बेशुद्ध अवस्थेत निपचित पडला होता. जॉनचं निरीक्षण संपल्यावर त्याला असं वाटू लागलं की, हा विचित्र प्राणी कोणी का असेना पण त्याला आता मदतीची आणि प्रथमोपचाराची तीव्रतेनं गरज आहे. त्याला वाचवणं हे मानवतेला धरून होईल. आणि विकृत माणूस कितीही क्रूर असला तरी उपकारकर्त्यावरच काही तो उलटणार नाही. एवढी जाणीव प्राण्यांनाही असते. मग ह्याला तर निश्चितच असेल.

असे मानवतावादी विचार जॉनच्या मनात येऊ लागले. आणि तो ताबडतोबीनं त्याच्या मदतीसाठी पुढं सरसावला. जॉननं त्याला उचलण्यासाठी उजवा हात त्याच्या मानेखाली आणि डावा हात कमरेखाली घातला. त्याच्या धिप्पाड शरीरयष्टीवरून तो अत्यंत वजनदार प्राणी असेल असं जॉनला वाटल्यामुळं त्यानं जोर लावून



त्याला उचलला आणि धडपडलाच. कारण त्यानं जो अंदाज केला होता तो साफ चुकला होता. त्याचं वजन जॉनच्या अंदाजापेक्षा खूपच कमी होतं. जॉनला आश्चर्याचा आणखी एक धक्का बसला. एवढ्या धिप्पाड प्राण्याचं वजन एवढं कमी!

जॉनला वाटत राहिलं की हे सगळंच विचित्र आहे. त्याच्या डोक्यात ह्या अनुभवानं मुंग्या यायला लागल्या. जॉननं त्याला मग सहजगत्या आपल्या खांद्यावर घेतलं आणि घरची वाट चालू लागला.

पंधरा-वीस मिनिटांनी तो त्याच्या शिकारी कुत्र्यांजवळ येऊन पोहोचला. ते कुत्रे जॉनच्या खांद्यावरील विचित्र प्राण्याकडं बघून जोरजोरानं भुंकायला लागले. जॉन त्यांच्यावर ओरडला आणि त्यांना गप्प करण्यासाठी धडपडू लागला. पण कुत्रे काही गप्प होईनात. जॉनच्या हाकण्यामुळे ते दूर पळाले, पण त्याच्याभोवती विशिष्ट अंतरावरून भुंकत जॉनच्या मागं मागं चालू लागले.

जॉननं खांद्यावरील प्राण्याच्या अंगावर जाड कापड पांघरलं आणि विचार करत चालू लागला. त्याला कळलं की, कुत्र्यांनाही विचित्र प्राण्याचा वास आला होता. हा प्राणी नेहमीचा माणूस नाहीय हेही त्यांना कळलं होतं. खांद्यावरील प्राण्याच्या अस्तित्वाविषयी आणि तो कोण असेल याविषयी विचार करता करता तो त्याच्या इग्लूजवळ झपझप जायला निघाला. पण त्याला त्याच्या कोणत्याच शंकेचं निरसन करता येत नव्हतं.

'कुणी का असेना, तो शुद्धीवर आल्यावर कळेलच आपल्याला,' असा विचार करून जॉननं त्याच्या अधिऱ्या मनाची समजूत घातली. आणि मग शांत चित्तानं तो त्याच्या पाच किलोमीटर अंतरावरील इग्लूकडं झपझप पावलं टाकता झाला.

घरी पोहोचल्यावर जॉनच्या बायकोनं- रूथनं- त्या विचित्र प्राण्याकडं पाहिलं अन् ती घाबरली. ''कुणाला घेऊन आलात? हा कोणीतरी यती दिसतोय,'' असं घाबरत घाबरत ती आपल्या नवऱ्याला म्हणाली.

''मलाही तसं सुरुवातीला वाटलं. पण काही सांगता येत नाही. आपल्यापैकी कुणीतरी आजपर्यंत यती पाहिलाय काय? त्या

सगळ्या सांगोवांगीच्या गोष्टीच ऐकल्यात आपण. हा कुणी का असेना. सध्या त्याला यातनांतून मुक्त करणं आपलं प्रथम कर्तव्य आहे. त्याला औषधाची आणि उबेची तसंच अन्नाची गरज आहे.''

त्या प्राण्याला इग्लूतील पलंगावर झोपवल्यानंतर एक दीर्घ श्वास घेत जॉन म्हणाला, ''मला नाही वाटत हा यती असेल. कारण यती हा तर हिममानव आहे. त्याला हिमबाधा कशी होईल. प्रचंड बर्फात राहणं हा तर त्याचा मूलभूत गुणधर्म आहे. त्याचं शरीर कडाक्याच्या थंडीला आणि बर्फाला सरावलेलं असतं.''

नवऱ्याच्या ह्या आश्वासक बोलण्यानं रूथला धीर आला. ती त्याच्याजवळ गेली अन् त्याच्या सोनेरी कांतीवरून कुतूहलानं हात फिरवू लागली. असं करताना जेव्हा तिचा हात त्याच्या डाव्या पायाजवळ गेला तेव्हा तिनं तो झटका बसल्यासारखा बाजूला केला.

''अरे! ह्याचा डावा पाय तर मोडलेला आहे. त्याच्या पोटरीची दोन हाडं बाहेर आलेली आहेत,'' रूथ जवळजवळ ओरडलीच.

जॉन त्याच्या पायाजवळ वाकला आणि पाहिलं तर खरोखरच त्याच्या पँटीतून दोन हाडांची टोकं बाहेर डोकावत होती.

''यावरून सिद्धच होतंय की हा यती नाही! त्याची कधीच अशी हाडं मोडत नाहीत.'' जॉनला उत्तर गवसल्यासारखं वाटलं. एव्हाना हा यती नाही याची दोघांनाही खात्री पटली होती. ''जा. ताबडतोब गरमगरम मटणाचा रस्सा घेऊन ये. त्याला चमच्या चमच्यानं भरवू. थोडं अन्न पोटात गेल्यावर तो शुद्धीवर येईल. तेवढ्यात मी त्याची हाडं ताणून नीट बसवतो, मग त्यावर मलमपट्टी करता येईल,'' असं म्हणत जॉननं त्याच्या गुडघ्याखालची पँट टरकावली आणि त्याची हाडं सेट करू लागला. त्यावर लाकडी पट्ट्या बांधून जखम व्यवस्थित बांधली.

तेवढ्यात रूथही गरमागरम मटणाचा रस्सा घेऊन आली. फुंकर मारून चमच्या चमच्यानं त्याला भरवू लागली. जेव्हा त्या विचित्र प्राण्यानं डोळे उघडले तेव्हा तिच्या हातातला चमचा मानसिक धक्क्यानं गळून पडला. ती डोळे विस्फारून त्याच्या डोळ्यात पाहात होती. त्या विचित्र प्राण्याच्या डोळ्यात काय होतं असं?



रूथला दिसलं की, त्या डोळ्यांतून ध्रुवीय प्रकाशासारख्या रंगीत छटा बदलत जाताहेत. असे डोळे तिनं यापूर्वी कधीच पाहिले नव्हते. त्या डोळ्यांचं तेज एवढं प्रखर होतं की, बदलत जाणाऱ्या रंगछटांचा एक इंद्रधनुषी पट्टाच तिच्या डोळ्यापुढं साकार झाला.

शुद्धीवर आल्यावर त्या विचित्र प्राण्याचं लक्ष दोन लहानखुऱ्या, कातड्यांनी पांघरलेल्या माणसांकडं गेलं. तो आश्चर्यानं इकडंतिकडं पाहू लागला. लवकरच तो भानावर आला. त्याला त्याचा अपघात झाल्याचं... तो सरपटत चालल्याचं... उंचवट्यावर पोहोचल्यानंतर बेशुद्ध पडल्याचं सारं काही क्षणात आठवलं. ही दोन्ही माणसं आपली शुश्रूषा करताहेत हेही जाणवलं. ही जाणीव झाल्याबरोबर तो त्यांच्याकडं कृतज्ञ भावनेनं पाहू लागला. त्यांचे आभार मानण्यासाठी त्यानं हात उंचावला पण त्या हालचालीनं त्याच्या हातापायाला कळा आल्या आणि तो पुन्हा बेशुद्ध पडला.

पुढचे तीन दिवस तो अर्धवट बेशुद्ध अवस्थेत होता. कधी तो ग्लानीत काहीतरी पुटपुटायचाही. पण तो काय पुटपुटतोय हे काही जॉनला किंवा रूथला कळलं नाही. त्याची भाषाच एकदम वेगळी होती. त्याचा आवाजही माणसाच्या आवाजापेक्षा जरासा वेगळाच वाटला त्यांना. हे तीन दिवस तो जीवनमरणाच्या सीमरेषेवर हिंदोळे खात होता. जॉन आणि रूथच्या सततच्या सेवाशुश्रूषेमुळंच तो चौथ्या दिवशी जागा होऊ शकला. गेले तीन दिवस रूथ आणि जॉन त्याचं औषधपाणी तसंच शरीरात ऊर्जा निर्माण करणारं अन्नही त्याला भरवत होते. परिणामी शुद्धीवर आल्यावर त्याला ताजातवाना झाल्यासारखं वाटलं. पण तरीही अजून भरपूर अशक्तपणा होताच.

त्याच्या चेहऱ्यावर आणि हातापायावर झालेल्या जखमा हळूहळू भरत यायला लागल्या होत्या. जॉननं मोडलेली हाडंही व्यवस्थित सेट केली होती. त्यानं जेव्हा आपल्या हातापायाकडं बघितलं तेव्हा त्याला आढळलं की, जखमांवर मलमपट्टी केलेली आहे, तर पायाला बॅंडेज बांधलंय.

त्यानं मान वळवून जॉनकडं पाहिलं. जॉन त्याच्याकडं

आपुलकीच्या नजरेनं पाहत होता. त्याच्या चेहऱ्यावर समाधानाचं हास्य दिसत होतं. जॉन त्याला अगदीच लिलिपुट वाटला. नंतर त्याचं लक्ष घरात जळणाऱ्या तेलवातीकडं गेलं. तो प्रकाशही त्याला वेगळाच वाटला. रूथही त्याच्याकडं बघत होती. त्याला जाणवलं की ह्या लिलिपुटांनीच आपला जीव वाचवलाय.

तो पूर्ण शुद्धीवर आलाय हे पाहून जॉन त्याला म्हणाला, ''मला कळत नाहीय की मी तुझ्याशी कोणत्या भाषेत बोलू. पण तुझं माझ्या इग्लूमध्ये स्वागत असो. मी तुला जेव्हा त्या बर्फानं भरलेल्या प्रदेशात उंचवट्यावर पाहिलं तेव्हा तू जवळजवळ मेलेलाच होतास. माझ्या बायकोनं- रूथनं- तुझी गेले चार दिवस, दिवस अन् रात्र शुश्रूषा केलीय. त्याचं फळं म्हणजे तू आता शुद्धीवर आलायस. फार बरं वाटलं आम्हाला. एक जीव वाचवल्याचं समाधान वाटतंय.''

जॉनचं ते बोलणं ऐकून त्यानं डोळे विस्फारले. त्यांची भाषा जरी कळली नव्हती तरी जॉन ज्या पद्धतीनं हातवारे करीत बोलत होता. त्यावरनं आणि त्याच्या शब्दातील ओलाव्यावरनं त्याला जणू काही सारं समजलं होतं. त्यालाच माहीत होतं तो कोण आहे आणि कुठून आलाय ते. मग त्यानं आपले डोळे जॉनच्या डोळयात केंद्रित केले. त्याचे ओठ जरी हलले नाहीत तरी जॉनच्या मेंदूत त्याचे शब्द शिरले.

''घाबरू नकोस माझ्या प्रिय मित्रा, मी तुझ्याशी तुला कळेल त्याच भाषेत बोलतोय. पण माझं हे बोलणं म्हणजे मेंदूतील संवेदना संक्रमित करणं आहे. त्यामुळं तू फक्त माझ्याकडं बघत राहा. माझा मेंदू तुझ्या मेंदूशी सारं काही बोलेल. तुला माझा प्रत्येक शब्द कळेल. आणि तू तुझ्या भाषेत जरी बोललास तरी ते माझा मेंदू मला माझ्या भाषेत सांगू शकेल. फक्त तू माझ्या डोळयात बघत सावकाशपणे आणि स्पष्ट उच्चारानं बोल.''

जॉन त्याच्याकडं कौतुकानं आणि आश्र्चर्यानं दिग्मूढ होऊन पाहू लागला. हे काहीतरी विचित्रच घडत होतं. सगळं काही अनाकलनीय होत होतं.

''अरे! तू जे बोललास ते सगळं मला कसं समजू शकतंय? तुझे ओठ हलत नाहीत तरी तुझा प्रत्येक शब्द न् शब्द माझ्या



मनात स्पष्ट अर्थ देतोय. खरंच तू कोण आहेस? तुझ्यासारखा माणूस मी पृथ्वीवर कधीही पाहिला नाहीय. पुस्तकातील चित्रातही कधी तू दिसला नाहीस. आणि अचानक आज प्रत्यक्षात तू माझ्या समोर आहेस. सांग ना तू कोण आहेस?'' जॉन म्हणाला.

''मित्रा, तू अगदी खरंच बोललास की, माझ्यासारखा प्राणी ह्या भूतलावर तू कधीच पाहिला नाहीस ते. अरे, पाहशीलच कसा? कारण मी पृथ्वीवासी नाहीच मुळी. मी ह्या सूर्यमालेच्या पलीकडून आलेलो आहे.''

जॉनला हे ऐकून आता मात्र आश्र्चर्यानं वेडं व्हायची पाळी आली. त्याच्या आपल्या कानांवर विश्र्वासच बसेना. परग्रहावरील माणसांच्या काही कथा त्यानं आजपर्यंत ऐकल्या होत्या. पण त्या सगळ्या कथाच होत्या. आज प्रत्यक्षात त्याच्यासमोर परग्रहवासीच होता. आणि तो त्यांच्याशी चक्क बोलत होता. जॉननं स्वतःला एक चिमटा घेतला आणि आपण जागे असल्याची खात्री करून घेतली.

''अगं ऐकलंस का?'' जॉन रूथकडं वळून आश्र्चर्यानं ओरडला, ''हा माणूस माझ्याशी माझ्या शरीरात शिरल्यासारखा माझ्या मेंदूशी बोलतोय आणि त्याचं सगळं बोलणं मला कळतंय. हा पृथ्वीवासी नाहीय तर हा दूरच्या कुठल्यातरी सूर्यमालेतील आहे.''

जॉनचं हे बोलणं ऐकून रूथ हादरलीच. तिनं त्या माणसाकडं भीतीयुक्त नजरेनं पाहिलं. त्याबरोबर तिच्या डोक्यात एकदम शांत शांत निर्मळ झरा वाहतोय असं तिला वाटू लागलं. तिची भीती संपुष्टात आली. आणि तिच्या शरीरात एक आवाज खेळू लागला. तिच्या मेंदूतून तिला एक आवाज ऐकू येऊ लागला.

''बाई, काही काळजी करू नकोस. तुला आणि तुझ्या नवऱ्याला मी कोणत्याही प्रकारचा त्रास देणं शक्य नाहीय. तुम्ही दोघे मला माझ्या आई-वडिलांसारखे आहात. तुम्ही मला जीवदान दिलंत. आपण तिघेही मानसिक स्तरावरचे सहजीवी झालो आहोत. आणि आता आपलं हे सहजीवन आपण जिवंत असेपर्यंत असंच अखंड राहील असं मी आश्र्वासन देतो. आपल्या मैत्रीत कुठलाही खंड पडणार नाही.''

रूथ जॉनकडं वळून आश्र्चर्यानं म्हणाली, ''त्याचा शब्द न्

शब्द माझ्या मनात कोरलाय. जणूकाही तो सरळ आपल्या मेंदूशीच- मनाशीच बोलतोय. त्याला आतल्या आवाजाशी संपर्क साधता येतोय.''

जॉननं रूथच्या खांद्यावर थोपटलं आणि आश्वासक स्वरात म्हणाला, ''मला माहिताय रूथो, मीही ते ऐकलंय. खरंच ही किमया विचित्र आहे. त्यानं मैत्रीचा हात पुढं केलाय. आपल्याला आई-वडिलांच्या स्थानी बसवलंय. तेव्हा आता घाबरायचं काही कारण नाहीय.''

मग त्या परग्रहवासीयाकडं वळत त्यानं विचारलं, ''तुझं नाव काय आहे?''

''एरीयल.''

''तू एवढा धिप्पाड असूनही तुझं वजन एवढं कमी का? तुला मी पाच किलोमीटर अंतर खांद्यावरून सहज आणू शकलो म्हणून मला आश्चर्य वाटतंय.''

''खरंय तुझं म्हणणं. मी ज्या जगात राहतो ना, तिथलं वातावरण तुमच्या इथल्या वातावरणापेक्षा विरळ आहे. त्यामुळं आमची शरीररचना हलक्या हाडांची आहे. आमच्या जगात गुरुत्वाकर्षण कमी आहे. म्हणूनच तुमच्याकडं माझ्यासारख्या माणसाचं वजन जेवढं असेल त्यापेक्षा माझं वजन कमी भरतं.''

''पण तू एकटाच कसा काय इथवर आलास? आणि त्या बर्फाळलेल्या उंचवट्यावर येऊन पडलास?''

''माझ्या यानात अचानक काहीतरी बिघाड झाला. कुठंतरी ते आदळलं आणि मी यानाच्या बाहेर भिरकावलो गेलो. जोरानं आदळल्यामुळं माझा पाय मोडलाच पण इतर ठिकाणीही जखमा झाल्यायत ते तर तू बघतोच आहेस. माझं यान त्या बर्फात कुठंतरी गाडलं गेलंय. बहुतेक त्या बर्फाच्या समुद्रात तळाशी गेलं असावं. माझ्या डोक्यालाही एवढा मार बसला की मी क्षणकाल कोण आहे आणि कुठून आलोय हेही विसरून गेलो. अपघात कसा झाला हेही मला आता नीटसं आठवत नाहीय.''

हे सर्व ऐकून जॉन किंकर्तव्यमूढ झाला होता. त्याला कळलंही होतं आणि नव्हतंही.



''हे सर्व माझ्या आकलनाच्या पलीकडंच आहे. तुझ्या कोणत्याही साथीदाराला न घेताच कसा काय एवढा लांबचा प्रवास केलास?''

जॉनचं हे बोलणं ऐकून एरीयल हसला आणि म्हणाला, ''नाही. तसं नाहीय. मी एकटा नाही आलो. माझ्या इतर साथीदारांबरोबर आम्ही एका मोठ्या अवकाशयानातून प्रवासाला सुरुवात केली होती. तुमच्या जगाच्या जवळ आल्यावर मला ह्या बर्फाळ प्रदेशाचा जवळून अभ्यास करावयाचा होता. म्हणून मी एकटाच एक छोटं यान घेऊन मोठ्या यानातून बाहेर पडलो. हे यान तुमच्या विमानासारखंच असतं. पण माझ्या यानात इंधनपुरवठा व्यवस्थित आहे की नाही हे तपासायचं विसरून गेलो होतो. त्यामुळंच यानात काहीतरी बिघाड झाला असावा असं आता वाटतंय.''

''हा तर तारुण्यातील अवखळपणा झाला. धाडसानं बेभान होऊन संकटाला आमंत्रण देणारा.'' जॉन चटकन् बोलून गेला.

''खरंय. मी पंधरा वर्षांचा तरुणच आहे. ही माझी पहिलीच अवकाश सफर आहे. त्यामुळंच अतिउत्साहाच्या भरात माझ्या हातून अशी चूक घडली.'' दिलगिरी व्यक्त केल्यासारखं एरीयल म्हणाला.

जॉन सहानुभूतीपूर्वक नजरेनं म्हणाला, ''मला तुला दोष द्यायचा नव्हता. पण माझ्या लक्षातच आलं नाही की तू एवढा लहान ...''

''बरोबरच आहे. कसं येईल लक्षात. कारण आमच्याकडं सगळीच माणसं उंचीपुरी आणि धिप्पाड असतात. मोठी माणसं तर माझ्यापेक्षाही उंच आणि धिप्पाड असतात. त्यांच्यात मी लहानच.'' एरीयल जॉनचं म्हणणं अर्धवट तोडत म्हणाला, ''पण तुमच्याकडच्या सगळ्याच माणसांची उंची कमी असल्यानं माझ्या उंचीकडं पाहून तुला मी मोठा वाटणं स्वाभाविकच आहे. त्यामुळं तुझा अंदाज चुकल्यामुळं तू दुःखी व्हायचं काहीच कारण नाही. ती माझीच चूक होती.''

जॉनला आता वेगळीच काळजी वाटायला लागली होती.

''पण आता तुझ्या साथीदारांना आम्ही कसं कळवणार की,

तू इथं सुरक्षित आणि जिवंत आहेस ते?''

एरीयलनं त्याच्या कमरेला बांधलेल्या पट्ट्याकडं अंगुलीनिर्देश केला आणि म्हणाला, ''हे काय त्यासाठी माझ्याकडं साधन आहे नं.''

त्यानं पट्ट्यावरील बकलातील एक बटण दाबलं. त्याबरोबर ओठ मिटून जसा 'हूंऽऽऽ' आवाज येतो तशा आवाजाची एक लकेर बाहेर पडू लागली. तिची तीव्रता एवढी होती की, तो आवाज इग्लूभर धुमला आणि थोड्या वेळानं सारं काही शांत झालं.

जॉन आणि रूथ डोळे विस्फारून ह्या घटनेकडं पाहत होते.

''हे यंत्र गोऱ्या माणसाच्या रेडीओसारखं आहे काय? जगातून दूर अंतरावर संदेश पाठवता येतो.'' भानावर आल्यानंतर जॉननं एरीयलला विचारलं.

''हा आवाज माझ्या साथीदारांना मी कुठं आहे त्याचं मार्गदर्शन करील. ह्या बर्फाळलेल्या भागातही गोरी माणसं राहतात काय?''

जॉन जड अंतःकरणानं म्हणाला, ''हो नं. ते आम्हाला रानटी समजतात. त्यांच्याकडं विमानं, यंत्रं आणि इतर जादुई सामुग्री असते. तिच्या सहाय्याने सगळ्या पृथ्वीवर ते नियंत्रण करू शकतात. दूरदूरपर्यंत बिनतारी संदेश पोहोचवू शकतात.''

चिंतातुर नजरेनं धाकधूक वाटत असल्यासारखं एरीयलनं विचारलं, '' तू त्यांना मी इथं असल्याचं ... मी सापडल्याचं कळवलं तर नाहीस ना?''

''मी? मी कसा काय कळवू शकेन? माझ्याकडं ना रेडीओ ना इतर काही यंत्र.'' जॉन हसत म्हणाला.

जॉनचं हे म्हणणं ऐकल्यावर एरीयलला हायसं वाटलं. ''हे ऐकून फार आनंद वाटला मला. जर गोऱ्या माणसांना माझं अस्तित्व जाणवलं असतं तर मी खरोखरच संकटात सापडलो असतो.''

सुमारे एका तासानंतर जॉनच्या इग्लूसमोर एक बशीसारखं यान उतरलं. त्या आवाजानं जॉन धावत बाहेर आला. त्याला ते यान म्हणजे उडती तबकडीच वाटली. त्या यानाच्या मधोमध एक दरवाजा उघडला गेला. त्यातून तीन प्रचंड उंच-जवळजवळ २० फुटी उंच-माणसं बाहेर पडली. आणि इग्लूच्या दिशेनं यायला लागली.



जॉन त्यांना बघून धावतच आत गेला आणि एरीयलला म्हणाला, ''तुझे साथीदार आलेयत बरं का!''

''आवाजावरनं मी ओळखलं होतंच.'' उठून उभा राहायचा प्रयत्न करीत एरीयल म्हणाला.

जॉननं त्याला आधार दिला. त्याचा डावा पाय अजून नाजुक अवस्थेत होता. अर्थात जॉनचा आधार म्हणजे त्याला लहानशा काडीचाच आधार होता. कारण जॉन त्याच्या जेमतेम कमरेएवढ्या उंचीचाच होता.

दरवाजातून बाहेर आल्याबरोबर एरीयलचं लक्ष समोरून येणाऱ्या त्याच्या वडिलांकडं गेलं. वडिलांनी त्याला पाहिल्याबरोबर त्याच्या दिशेनं हात पसरवून धाव घेतली. त्यांनी उन्माद अवस्थेतच एरीयलला मिठी मारली. त्यांच्या डोळ्यातून आनंदाश्रू वाहू लागले. आपल्या हातातून गेलेला पुत्र पुन्हा मिळाला म्हणून ते खूपच आनंदित झालेले होते. गेले चार दिवस परग्रहावर हरवलेला त्यांचा पुत्र अखेर त्यांना सापडला होता.

पहिला आवेग ओसरल्यानंतर ते दोघे एकमेकांकडं बघत डोळ्यात साठवून घेऊ लागले. एरीयलचे डोळे जणू काही बोलत होते. त्याने वडिलांना अथपासून इतीपर्यंत काय घडलं ते सांगितलं-यान कोसळल्यापासून ते जॉननं त्याला वाचवण्यापर्यंत सर्व काही सांगितलं.

सर्व कहाणी ऐकल्यानंतर एरीयलचे वडील जॉनकडं वळले. त्यांची नजर दयाळू होती. तिच्यातून एरीयलला जीवदान दिल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त होत होती. जॉन त्यांच्याकडं अनिमिष नेत्रांनी पाहत होता.

ते जॉनजवळ आल्यानंतर वाकले आणि आभार मानण्यासाठी आपला हात पुढे केला.

दरम्यानच्या काळात दुसरा परग्रहवासी जो एरीयलच्या वडिलांसोबत आला होता त्यानं एरीयलच्या शारीरिक तपासणीला सुरुवात केली होती. जॉननं लावलेली औषधं आणि मलमांनी त्याच्या जखमा भरून येऊ लागलेल्या दिसत होत्या. त्याला त्याचं कुतूहल वाटलेलं त्याच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतं.

एरीयलच्या वडिलांनी जॉनशी हस्तांदोलन करीत जॉनच्या डोळ्यात बघत सांगितलं, ''एरीयलनं मला सर्व काही सांगितलंय. तू त्याचा जीव वाचवलायस त्याबद्दल आम्ही तुझे कायमचे ऋणी आहोत. तुम्ही दोघांनीही ज्या पद्धतीनं एका अज्ञात परग्रहवासीयाचं जीवसंरक्षण केलंत त्याबद्दल तुमचे आभार कसे मानावेत ... तुमचं उतराई कसं व्हावं हेच कळेनासं झालंय.'' एरीयलच्या वडिलांचं हे सद्‌गदीत होऊन बोलणं जॉनच्या मनात कळत होतं. जॉनच्या मेंदूत त्याची संवेदना यथास्थितपणे संक्रमित होत होती. ''आम्हाला तर वाटलं होतं की आता आम्हाला एरीयल कायमचा सोडून गेलाय. तो आणि त्याचं यान नष्ट झालंय. आम्ही तर आशाच सोडून दिली होती. पण हे सर्व तुझ्यामुळं झालं. खरंच तुम्ही पृथ्वीवासी फारच सेवाभावी आणि ममताळू आहात.''

ह्या स्तुतीनं जॉनला गुदमरल्यासारखं झालं. त्याची कुणी स्तुती केली की त्याला नेहमी असंच व्हायचं. कारण लोकांच्या उपयोगी पडणं हा त्याचा स्वभावधर्मच होता. त्यात कुठलीही उपकाराची भावना नसायची. त्यामुळं आपण काहीतरी वेगळं केलंय असं त्याला कधीच वाटलं नव्हतं. त्याचं वागणं हे माणुसकीला धरून होतं. म्हणूनच कुणी स्तुती केली की तो जरा अस्वस्थ व्हायचा. तसंच आताही झालं.

म्हणून जॉननं विषय बदलत म्हटलं, ''चला, तुम्ही त्याला भेटलात हे बरं झालं. आता तो तुमच्यासोबत जाऊ शकेल. पण तुम्ही कुठल्या ग्रहावरून आलात?

''तुमच्या सूर्यमालेपासून पन्नास प्रकाशवर्षं अंतरावरील दूरच्या सूर्यमालेतील आहोत आम्ही. आमच्या मातृग्रहाचं नाव आहे 'हायपेरॉन'. आमच्या सूर्यमालेतील हा चौथा ग्रह आहे. आम्ही परग्रहावरील जीवसृष्टीचा शोध घेण्यासाठी निघालो होतो. प्रवास करता करता आमच्या यंत्रांनी आम्हाला तुमच्या सूर्यमालेची माहिती पुरवली. त्या माहितीनुसार तुमच्या सूर्यमालेतील तिसऱ्या ग्रहावर जीवसृष्टी असल्याचं कळलं. म्हणून आमचं यान ह्या दिशेनं वळवलं. तुमच्या ग्रहाच्या जवळ आल्यावर येथील समुद्र, वनस्पती, प्राणी आणि तुम्हा मानवाची उत्तुंग शहरं पाहून थक्कच झालो.



इथंही प्रगत जीवसृष्टी आहे याचा आम्हाला आनंद झाला. म्हणून एक लहानसं यान घेऊन मी एका शहराजवळ गेलो ते काय, त्याचा पत्ता लागून तुमच्या माणसांनी माझा पाठलाग आरंभला. बॉम्बगोळ्यासारखा कसलातरी वर्षाव केला. अर्थात्च आमच्या यानाचा वेग प्रचंड असल्यामुळं मी वाचू शकलो.''

''हे बहुतेक त्या गोऱ्या माणसांचंच काम असणार,'' जॉन पटकन् बोलून गेला.

''हो तर. मग आम्ही ठरवलं की, तुमच्या ग्रहावरील निर्जन जागेवर येऊन संशोधन करायचं. ह्या भागात मैलोगणती बर्फच बर्फ आहे. तेव्हा ह्या भागाचा अभ्यास करण्यासाठी एरीयलला पाठवायचं ठरलं. तो तर याचीच वाट बघत होता. पण तारुण्याच्या अतिउत्साहामुळं त्यानं हा अपघात ओढवून घेतला. असो. तुम्ही इथले मूळ लोक आहात नाही का? एरीयलच्या बोलण्यातनं कळलं मला ते.''

''हो नं. पण सारी पृथ्वी ह्या गोऱ्या लोकांनी पादाक्रांत करून ठेवलीय.'' जॉन दुःखी स्वरात म्हणाला, ''ते आम्हाला रानटी म्हणतात. कारण आम्ही त्यांच्याएवढे सुधारलेले नाही आहोत. त्यांनी ह्या भागातल्या आमच्या जमातीला 'एस्किमो' असं नाव दिलंय. खरंतर ही सगळी भूमी मूळची आमची. पण संशोधनाच्या नावाखाली ते गोरे लोकचं इथं राज्य करताहेत.'' जॉनच्या बोलण्यातून गोऱ्या लोकांविषयीची अप्रीती स्पष्टच दिसत होती. आणि का असू नये? जर गोरे लोक त्यांना पारतंत्र्यात वागवत असतील तर; त्यांच्या स्वच्छंदी जीवनावर बंधनं घालत असतील तर; त्यांना स्वतःच्याच घरात कोंडल्यासारखं राहायला लागत असेल तर; जॉनला गोऱ्या लोकांविषयी तिरस्कार वाटणं स्वाभाविकच होतं.

जॉन तीव्रतेनं म्हणाला, ''एस्किमो हे नाव भारतीय आहे, पण ते चुकीचं आहे. असो. तुम्ही कोण आहात?''

''आम्ही 'हायपेरॉनीयन'वासी आहोत. आमच्या मातृग्रहावरनंच हे नाव आम्हाला पडलंय. आमच्याकडं तुमच्यासारख्या जातीजमाती नाहीयत. संपूर्ण हायपेरॉन ग्रह हे एकच राष्ट्र आहे आणि स्थानिक पातळीनुसार प्रांतिक राज्ये आहेत.

पण सर्व कारभार एकाच ठिकाणाहून चालतो. त्यामुळं आमच्याकडं तुमच्यासारखी युद्धं होण्याचा संभव नाहीय. आमच्या संशोधनातून आम्हाला कळलंय की तुम्ही अण्वस्त्रांच्या सहाय्यानं एकमेकांचे गळे घोटायची जय्यत तयारी केलीय. पण त्यामुळं तुमची मानव जमातच नाही का नष्ट होणार? ह्या ग्रहावरील सारी सजीवसृष्टीच त्यामुळं लयाला जाईल. अत्यंत सुंदर निसर्गानं नटलेला तुमचा ग्रह तुम्ही तुमच्या हातांनीच वैराण करणार अशानं.'' एरीयलच्या वडिलांच्या बोलण्यातून चिंता डोकावत होती.

जॉनला सारं काही कळलं नाही पण तो म्हणाला, ''म्हणजे तुम्ही इथल्या गोऱ्या लोकांवर राज्य करण्यासाठी आला आहात?''

''नाही. आम्ही फक्त इथल्या लोकांचा अभ्यास करायला आलो आहोत. तुमची ही जी गोरी माणसं आहेत ती कशा प्रकारची प्रगती करताहेत. जगाचं नियंत्रण कशा पद्धतीनं करताहेत. अवकाश संशोधनात कुठवर आणि कशी भरारी मारलीय. ह्या साऱ्यांचा अभ्यास करणं आमचा प्रधान हेतू आहे. एवढंच नव्हे तर आरोग्य, अन्नधान्य समस्या यावरही कुठपर्यंत पोहोचले आहेत याचाही अभ्यास करायचा आहे. तुमच्याकडचे संगणक, यंत्रमानव इ. आमच्याकडं मागच्या काही शतकातच निर्माण होऊन जुने झाले, जे तुमच्या प्रगतीचे आघाडीचे टप्पे आहेत. आम्ही मनाशी संवाद करायचं कला-शास्त्र आत्मसात केलंय. त्यामानानं तुम्ही अजून फारच मागे आहात. आमच्या यानाचे वेगही प्रकाशाच्या वेगाची बरोबरी करू शकणारे आहेत. ते तंत्रज्ञान तुम्हाला मिळवायला. अजून काही शतकं जावी लागतील. पण तरीही तुमची ही गोरी जमात आहे ती लवकरच प्रगतीचा पुढचा टप्पा गाठणार यात शंकाच नाही. सध्या तुमची यानं तुमच्याच सूर्यमालेपलीकडं जाण्याइतपत प्रगती झालीय. त्यामुळं आमच्या ग्रहवासीयांना हा प्रश्न पडलाय की, तुम्ही सूर्यमालेबाहेर नियमितपणं अवकाशभ्रमंती करू लागल्यावर कोणत्या प्रकारचे संबंध आमच्याशी ठेवाल. तुमच्याबरोबर काही नवीन प्रश्न तर निर्माण होणार नाहीत ना? आंतर्ग्रहीय युद्धांचा तर आम्हाला तिटकारा आहे. आम्हाला सर्वांशी मित्रत्वानं राहायची सवय झालीय. एवढ्या दूर अंतरावरचे आपण



भेटल्यानंतर एकमेकांशी चढाओढ करण्यापेक्षा एकमेकांच्या प्रगतीत सहकार्य नाही का करू शकणार? मला वाटतं तेच जास्त योग्य राहील. तुमच्या गोऱ्या माणसांनाही हा विचार सुचायला हवाय.'' आपण फार बोलल्याची जाणीव एरीयलच्या वडिलांना झाली. ते जॉनकडं पाहू लागले.

जॉनला त्यांच्या मनाचा मोठेपणा समजला होता. त्याला वाटलं, खरोखर आकाशातील देवच आपल्याशी बोलतोय. तो भक्तिभावानं त्यांचं बोलणं ऐकत होता. त्यांचं बोलणं थांबल्यावर त्यानं विचारलं, ''खरोखरच तुमच्याकडं युद्धाचा प्रश्न मिटलाय?''

''अर्थात. आणि अवकाशातील परग्रहवासीयांच्या ज्या काही मोजक्याच वसाहती सध्यातरी माहिती आहेत त्यांच्या संपर्कात येणाऱ्या आणि संबंध प्रस्थापित करणाऱ्या सगळ्यांना हा आंतर्ग्रहीय प्रश्न सोडविल्याशिवाय आमच्या अंतर्अवकाशीय संघटनेत प्रवेश मिळतच नाही. तेव्हा तुमच्या गोऱ्या लोकांनाही हा प्रश्न लवरकच सोडवावा लागेल. आणि तुमची संपूर्ण पृथ्वी एक राष्ट्र ही कल्पना राबवावी लागेल. सर्व जाती, पंथ, धर्म यांचे भेद विसरून अखंड 'मानवताधर्म' स्वीकारावा लागेल.''

जॉन भारावलेल्या अवस्थेत त्यांच्याकडं पाहत म्हणाला, ''खरंच असं झालं तर गोऱ्या माणसांच्या-नव्हे साऱ्या पृथ्वीवासीयांच्या भविष्यात सुखद काळ आहे म्हणायचा.''

एरीयलच्या वडिलांनी होकारार्थी मान हलवली आणि आपल्या साथीदारांकडे बघून यानाकडं चलण्याची खूण केली. त्यांच्या दोन्ही साथीदारांनी एरीयलला उचललं आणि यानाकडं जायला निघाले. एरीयलनं त्यांना मध्येच थांबवलं आणि त्यानं जॉनला आपल्याकडं बोलावलं.

जॉन जवळ आल्यावर एरीयल त्याच्या डोळ्यात बघत बोलू लागला. जॉनच्या मेंदूत शब्द गुंजन करून लागले.

''मी माझ्या ग्रहावर परत गेल्यावर सगळ्या लोकांना सांगेन की, पृथ्वीवरील एक दयाळू माणसानं मला कसं वाचवलं. बर्फाळलेल्या प्रदेशातून जवळपास मर्त्य अवस्थेत उचलून आणून तू आणि रूथनं माझी कशी शुश्रूषा केली. आमच्या लोकांना हे सारं

अप्रुप वाटेल. त्याची एक सुंदर कथा तयार होईल. आणि जेव्हा केव्हा पृथ्वीवासी त्यांची अवकाश यानं घेऊन आमच्या ग्रहावर येतील तेव्हा त्यांना आपल्याच पृथ्वीवरील जॉनची कर्तृत्वगाथा ऐकायला मिळेल. खरोखरच तू फार मोठा आहेस. आता पुन्हा कदाचित भेटू न भेटू, पण तू मात्र आमच्या ग्रहावर अमर होऊन राहणार हे निश्चित. तुझी माझी साथ आता कायमची राहणार आहे, मित्रा.'' एरीयलच्या डोळ्याच्या कडा ओलावल्या. त्याचे ओठ भावनावेगानं थरथरू लागले. त्यानं झटकन् मान वळवली आणि त्याच्या साथीदारांनी त्याला आधार दिला.

त्यांनी यानाच्या दारात प्रवेश केला. एरीयलनं मागे वळून पाहिलं आणि हात उंचावला. जॉन आणि रूथ दोघेही गदगदत होते. अविस्मरणिय भेटीचा शेवट जवळ आला होता. यानाचे दरवाजे मिटले गेले. आवाज करत यान जागेवरून उठलं, वर जाण्यासाठी. खिडकीतून एक व्यक्ती जॉनकडं टक लावून पाहत होती आणि हात हलवत होती. जॉनचंही त्या व्यक्तीकडं लक्ष होतं. तोही आपला हात उंचावून बिदाई देत होता.

यान आकाशात उंच उंच जाऊ लागलं. यानातील ती व्यक्ती अजूनही जॉनकडं टक लावून पाहत होती. जॉनची आकृती लहान लहान होत चालली होती. शेवटी जॉनची आकृती त्या प्रदेशातील बर्फात मिसळल्यावरच त्यानं खिडकीतून पाहणं बंद केलं आणि म्लानपणे डोळे मिटून घेतले.

□ ■ □ ■ □

## अंतराळात ऊब हवी

२१ व्या शतकाच्या मध्यापर्यंत गगनचुंबी शिखरांचा प्रत्येक भाग न् भाग पादाक्रांत केला गेला होता, तर समुद्राच्या तळातील कोपरा न् कोपराही; एवढंच नव्हे तर तिथं असलेल्या खनिज संपत्तीचा वापरही सहज करता येण्यासारख्या यंत्रणा उभारल्या होत्या. त्यामुळं आता पृथ्वीवर कोणत्याही प्रकारचं अद्‌भुत आश्चर्य शिल्लक राहिलं नव्हतं. राहता राहिलं होतं अवकाश. आणि अवकाश प्रकल्प जरी सहजसाध्य असला तरीही अवकाशात गेलेला परत पृथ्वीवर सुखरूप येईलच याची अजूनही शाश्वती नव्हती.

म्हणूनच सुरुवातीला विशालला 'भारत अवकाश संशोधन' केंद्रातील अधिकाऱ्यांनी आर्मस्ट्राँग या अवकाशस्थानकावर असणाऱ्या त्याच्या वडिलांना-रवीला-भेटायला जायची परवानगी दिली नव्हती. त्यासाठी रवीला मात्र केंद्रीय अधिकाऱ्यांशी बरीच वादावादी करावी लागली होती. रवीनं त्यासाठी काय केलं नाही?

अर्ज, विनंत्या आणि शेवटचा उपाय म्हणून नोकरी सोडण्याची धमकीही दिली. तेव्हा कुठं अधिकाऱ्यांनी ह्या नियमबाह्य मागणीपुढं मान तुकवली होती. कारण त्यांना रवीसारखा मोहोरा गमावायचा नव्हता.

"मी जवळजवळ चार वर्षं माझ्या मुलाला भेटलेलो नाहीय आणि आर्मस्ट्राँगवरून मला पृथ्वीवर जायला वेळही मिळालेला नाहीय. तो तिथं कसा राहत असेल ह्याविषयी मला चिंता लागून राहिलीय. कदाचित तो मला ओळखेल की नाही कुणाला ठाऊक." अधिकाऱ्यांसमोर आपलं म्हणणं रवीनं मांडलं.

अधिकाऱ्यांनी त्याला कारणं द्यायचा प्रयत्न केला. नियमावली दाखवली. पण सरतेशेवटी त्यांना रवीची ही असामान्य मागणी मान्य करण्याशिवाय गत्यंतरच नव्हतं.

सर्वात महत्त्वाचं कारण म्हणजे विशाल हा त्याचा एकुलता एक मुलगा होता-तोही आईविना. विशालची आई पृथ्वीवर एका विचित्र आजारानं अंथरूणाला खिळली होती. त्यातच तिचा अंत झाला होता. तिच्यावर अगदी उत्तमोत्तम औषध उपचार करूनही काही उपयोग झाला नव्हता. त्यातच विशालही त्याच आजारानं ग्रस्त झाला. त्यावर ताबडतोब इलाज सुरू झाले म्हणूनच तो बचावला. पण तरीही त्या आजारानं विशालला प्रसाद दिलाच. विशाल आजारातून बरा झाला, पण तो मुका झाला. त्याच्या स्वरयंत्रात बिघाड होऊन तो कायमचा मुका झाला होता.

दुसरं कारण म्हणजे रवी हा आर्मस्ट्राँग अवकाशस्थानकाचा मुख्याधिकारी होता. किंबहुना त्यापेक्षाही मोठा होता. कारण जवळजवळ बारा वर्षं राबराबून हे अवकाशस्थानक निर्मिलं होतं. अवकाशस्थानकाची निर्मिती ही जीव ओतून काम करणाऱ्या शास्त्रज्ञांशिवाय होणं कठीणच होतं. रवीनं बारा वर्षं त्यासाठी तपश्चर्या केली होती. त्याच्या बुद्धिमत्ता आणि मेहनतीचं फळ म्हणजेच हे 'आर्मस्ट्राँग' अवकाशस्थानक होतं.

केंद्रीय अधिकाऱ्यांना अशा झोकून देऊन काम करणाऱ्या, बुद्धिमान शास्त्रज्ञानं दुःखी राहणं परवडण्यासारखं नव्हतं. कारण त्याचा परिणाम संपूर्ण संशोधनावर होऊ शकणार होता. म्हणूनच



शेवटी नाईलाजानं विशालला पाठविण्याची व्यवस्था करावी लागली होती. कारण रवीला तर सुटी देणं शक्य नव्हतं.

विशाल मुका असला तरी चपळ, चौकस आणि बुद्धिमानही होता. केंद्रीय अधिकाऱ्यांना त्या दोघांच्या भावना समजू शकत होत्या.

विशाल अवकाशतळावर उतरल्यापासून रवीच्या मनात हा सगळा इतिहास झटकन डोळ्यापुढून सरकला. नियंत्रण कक्षात तो एका पिंजऱ्यात अडकलेल्या वाघाप्रमाणं येरझारा घालत होता. विशालला केव्हा एकदा भेटतो असं त्याला झालं होतं. त्यानं दूरदर्शन संच चालू करणारं बटण दाबलं. त्याला दिसलं की, तो आगगाडीचा डबा आता अवकाशस्थानकात शिरतोय. अवकाश-तळ व स्थानकाला जोडणाऱ्या बोगद्यातून डबा घुमटाकार अवकाशस्थानकाच्या तोंडाशी थांबला.

"तुला पाहून किती आनंद झालाय मला, माझ्या राजा." गहिवरून रवी नियंत्रण कक्षातील दूरध्वनीवरून उद्गारला. विशालनं आनंदानं उडीच मारली. आपल्या वडिलांचा आवाज नियंत्रण कक्षातून येतोय हे विशालला ठाऊक होतं.

थोड्याच वेळात डब्यातून विशाल बाहेर पडला आणि नियंत्रण कक्षातून बाहेर पडणाऱ्या आपल्या वडिलांकडं धावत सुटला आणि रवीनं मिठीत घेण्यासाठी पसरलेल्या दोन्ही हातात स्वतःला झोकून दिलं. दोघांनाही गहिवरून आलं होतं. त्यांचे डोळे आनंदातिशयानं पाणावले होते.

किती मोठा झाला होता विशाल. त्याला पाहून रवीला आपल्या मृत पत्नीची आठवण झाली. तिच्यासारखेच अगदी कुरळे केस होते विशालचे. विशालच्या चेहऱ्यावर मिशांच्या केसांची लव दिसताच रवीला वाटलं, विशाल आता भराभर मोठा होतोय. विशालसुद्धा वडिलांकडं अनिमिष नेत्रांनी पाहत होता. वडिलांशिवाय एकट्यानं त्यानं पृथ्वीवर चार वर्षं काढली होती. तिथं अर्थातच त्याची काळजी घेणारे नातेवाईक आणि शाळेतले शिक्षक होते. पण त्यांना काय आईवडिलांची सर येणार! समाधानानं वडिलांच्या खांद्यावर विशालनं मान टेकवली.

'प्रवासात फार काही त्रास झाला नाही ना?' विशालला रवीनं

विचारलं तेव्हा त्यानं नकारार्थी मान हलवली. उलट हा प्रवास म्हणजे त्याच्या दृष्टिकोनातून अवर्णनीय असाच होता.

''ठीक आहे. आताच तुझ्या लक्षात येणार नाही पण 'अवकाशीय शक्ती' हा प्रकार तुला जाणवेल. काही काळजी करू नकोस. थोडी विश्रांती घेतली की बरं वाटायला लागेल. बरं, किती वाजलेत ठाऊक आहे?'' घड्याळाकडे बघत रवी म्हणाला, ''रात्रीचे बारा वाजलेत. आता आपण ताबडतोब झोपायला हवं नाहीतर तब्येतीवर परिणाम व्हायचा आणि इथं आजारी पडणं धोक्याचं असतं. त्यामुळं कामं ठरलेल्या वेळीच पार पाडायला हवीत.''

विशालनं वडिलांच्या कमरेत हात घालून चालायला सुरुवात केली. चालताना त्याच्या लक्षात आलं की, ह्या अवकाशस्थानकाचा आकार एका मोठ्या विमानतळाएवढाच आहे. आणि त्यावर संपूर्णपणे काचेच्या घुमटाचं आच्छादन आहे. एखाद्या मोठ्या बुडबुड्यासारखं दिसत होतं हे अवकाशस्थानक!

''ह्या अवकाशस्थानकाला 'आर्मस्ट्रॉंग' असं नाव का दिलंय माहीत आहे विशाल?'' विशालच्या नजरेतला शोधक भाव टिपत रवीनं विचारलं.

विशालनं आपल्या वडिलांकडं पाहिलं. ते सांगत होते, ''जगातला पहिला मानव नील आर्मस्ट्रॉंग ह्यानं चंद्रावर पहिलं पाऊल ठेवलं व अवकाश संशोधनाला वेगळी कलाटणी मिळाली. त्याच्या स्मरणार्थ हे नाव ह्या अवकाशस्थानकाला दिलंय. २० जुलै १९६९ हा दिवस जगाच्या इतिहासातील सुवर्णाक्षरांनी नोंदवला गेलेला दिवस होता. नील आर्मस्ट्रॉंग आणि एडवीन ऑल्ड्रीन यांनी चंद्रावर पाऊल ठेवलं होतं. पहिला सजीव अवकाशात आपला ठसा उमटवत होता. हा अनुभव किती रोमांचकारी असेल! मानवाचं हे लहानसं पाऊल वामनाच्या पावलासारखंच होतं म्हणेनास का. जवळजवळ दीडशे वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही. त्यांच्याच यशस्वी खांद्यावर उभं राहून आजची वाटचाल चाललीय, मग त्यांना विसरून कसं चालेलं!''

विशालनं घुमटाकार काचेच्या आच्छादनाकडं बोट दाखवून हातानं हे कशासाठी असा प्रश्न केला.



''काय आहे, हा जो घुमट आहे ना त्याचे दोन महत्त्वाचे उपयोग आहेत. एक म्हणजे ह्या घुमटामुळं अवकाशातील अपायकारक अदृश्य किरणांपासून बचाव होतो. म्हणजे असं की, अतीनील, अवरक्त इत्यादी प्रकारची किरणं ह्यामुळं अडवली जातात आणि दुसरं म्हणजे अवकाशस्थानकातील दाब आणि तापमान पृथ्वीसारखं राहावं ह्यासाठी त्याची मदत होते. ह्या घुमटात पृथ्वीवर असतं तसं वातावरण ठेवलं गेलंय. त्यामुळं इथं आपण पृथ्वीसारखं मुक्तपणे वावरू शकतो. खाऊपिऊ शकतो. म्हणूनच तर इथं अवकाशातील वजनरहित अवस्था जाणवत नाही. जसे काय आपण आपल्या पृथ्वीवरील घरातच राहतोय. ते बघ आपलं घर आलंच,'' असं म्हणत रवीनं विशालला जवळच असलेली एक लहानशी टुमदार बंगली दाखवली. खरं म्हणजे ते एक लहानसं घरच होतं. बंगली हा नित्याचा वापरायचा रूढ शब्द म्हणून वापरला एवढंच.

विशालचा हात हातात घेऊन रवीनं घरात आनंदानं प्रवेश केला.

आर्मस्ट्रॉंग हे अवकाशस्थानक मानवनिर्मित पहिलं अवकाशस्थानक होतं. दक्षिण धृवावरील एखाद्या कॅम्पसारखं भासत होतं इथलं वातावरण. सगळी बांधणी उच्च तापमानाला टिकाव धरणाऱ्या कठीण अशा प्लॅस्टीकपासून तयार केली होती. ते पोलादासारखं टणक तर होतंच पण वजनाने त्यापेक्षा खूपच कमी. सूर्यप्रकाशात ह्या अवकाशस्थानकाचा घुमट आणि आतील बांधकाम ऑपरेशन थिएटरसारखं चकचकीत दिसत होतं.

रवी त्याच्या राहत्या घराचा दरवाजा उघडणार इतक्यात त्याच्यासमोरून येणारा एक माणूस जोरानं त्यांच्या अंगावर धडकला. त्यामुळं विशाल धडपडून खालीच कोसळला. विशालच्या चेहऱ्यावर असंख्य वेदना उमटल्या. त्याबरोबर रवीनं त्या माणसाला मानगुटीला पकडून दूर ढकललं. तो हडेलहप्पी होता.

''हडेलहप्पी, तू प्यायलायस?'' रवी रागानं ओरडला, ''ताबडतोब डॉक्टरकडं जा आणि शुद्धीवर आल्यावर मला माझ्या ऑफिसमध्ये भेट.''

''मसणात जा. रवी तू कोण मला सांगणार?'' हडेलहप्पीनं नशेतच शिवी हासडत उत्तर दिलं. त्याला स्वतःचा तोल सांभाळणं अत्यंत कठीण जात होतं. तो सारख्या झोकांड्या खात होता. त्याच्या तोंडातून दारूचा भपकारा येत होता. विशालनं आपलं नाक दाबलं.

''तू माझ्या मुलाला खाली पाडलंस की आणि मी कोण सांगणार हे तुला चांगलंच माहिती आहे.'' रवी रागानं म्हणाला.

''तुझा मुलगा? मला वाटलं प्रयोगासाठी एखादा प्राणीबिणी आणलाय की काय?'' तांबारलेल्या डोळ्यांनी हडेलहप्पी म्हणाला आणि लडखडत चालता झाला. रवीला त्याच्या नाकावर एक सणसणीत ठोसा द्यावासा वाटला, पण त्यानं स्वतःला आवरलं. तो प्यायलेल्या अवस्थेत असताना त्याचं डोकं ठिकाणावर असणं कठीणच होतं. अशा वेळी त्याच्याशी वाद न घालणंच चांगलं होतं. रवी विशालकडं वळला आणि म्हणाला, ''चल, आपण घरात जाऊ. त्याच्याकडं लक्ष देऊ नकोस.''

ह्या अनपेक्षित प्रकारानं विशाल नाही म्हटलं तरी धास्तावला होता. त्याला हडेलहप्पीविषयी घृणा वाटू लागली होती. तो तर अवकाशयानातही चोरून चोरून दारू पीत होता हेसुद्धा विशालला आठवलं. तरीच अवकाशयानात तो कुणाशी आणि कुणीही त्याच्याशी बोलत नव्हतं. अशा माणसाची अवकाशस्थानकावर गरज काय, हे विशालला कळेना! त्याच्या मनात ह्या माणसानं प्रश्नचिन्ह निर्माण केलं होतं.

विशाल वडिलांबरोबर एका लहानशा घरात शिरला. विशालला घरातला पसारा पाहून कुठं बसावं हेच कळेना. त्यानं प्रश्नार्थक चेहऱ्यानं वडिलांकडं पाहिलं. त्या खोलीत वायर्स, कपडे, नटबोल्ट, यंत्राचे सुटे भाग सगळीकडं विखरून पडले होते. एवढंच काय पण तिथंच पदार्थ खाऊन थाळ्याही पडलेल्या दिसत होत्या.

''सगळेच शास्त्रज्ञ अशा अस्ताव्यस्त पद्धतीनं जगतात की काय?'' विशालला प्रश्न पडला. विशालच्या चेहऱ्यावरचे भाव टिपत रवी म्हणाला, ''कळलं बरं का तुला काय म्हणायचंय ते. पण काय करू? कामाच्या रगाड्यात घर स्वच्छ ठेवायला वेळच मिळत नाही



आणि इथं मोजकीच माणसं असल्यामुळं स्वावलंबनाशिवाय पर्याय नाही. चल, आता जेवायची वेळ झालीय.'' असं म्हणत त्यानं फ्रीज उघडला आणि त्यातून दोन हवाबंद डबे काढले. तेवढ्यात दरवाजावर टकटक झाली. रवीनं दरवाजा उघडला. दारात सूर्यभान उभा होता.

''बरं झालं तू आलास ते! कसं काय आहे पृथ्वीवर, सर्व ठीकठाक ना? रवीनं विचारलं.

''उत्तम,'' असं म्हणत त्यानं विशालकडे पाहिले आणि तो म्हणाला, ''अरे, तू तुझी सूटकेस विसरलास की. ही बघ मी आणलीय माझ्याबरोबर.''

घरात शिरत सूर्यभाननं हस्तांदोलन केलं. ''तुम्हाला पुन्हा भेटून खरोखरच खूप आनंद झाला. तुमचा काळ इथं मजेतच गेला असेल अशी आशा करतो आणि आता तर काय विशाल आल्यामुळं तो मजेतच जाईल.''

रवीनं त्याच्याकडं आपुलकीनं पाहिलं.

अचानकपणे सूर्यभानचा चेहरा गंभीर झाला. ''हडेलहप्पीनं पुन्हा दारू झोकलीय सर.''

''मला माहीत आहे.'' गंभीरतेनं रवी म्हणाला, ''आणि त्यामुळेच मी अस्वस्थ आहे. मी त्याला फार पूर्वीपासून ओळखतो. त्याचं वैयक्तिक आयुष्य अत्यंत अस्थिरपणे गेलंय. पण अजूनपर्यंत त्याचा आपल्याला कधीच त्रास झाला नव्हता. खरंतर तो एक उत्तम अवकाश वैमानिक आहे, अतिशय कुशल आणि निष्णात. म्हणून तर त्यानं आर्मस्ट्राँगवर यावं अशी शिफारस मीच केंद्रीय अधिकाऱ्यांकडं केली. पण आज तो तर अगदीच विचित्र वागला. पृथ्वीवर आणखीन काही वेगळं घडलं का त्याच्या संबंधात?''

सूर्यभाननं जवळची खुर्ची ओढून घेतली आणि बसत तो म्हणाला, ''त्याच्याविषयी पृथ्वीतलावर मी बऱ्याच चिंतायुक्त गोष्टी ऐकल्यायत. ह्या वेळेला पृथ्वीवर तो जेव्हा गेला होता तेव्हा एका स्मगलरच्या भूलथापांना बळी पडला. त्यानं हडेलहप्पीला चंद्रावर सोन्याच्या खाणी काढण्याच्या योजनेविषयी सांगून त्याची भागीदारी घेतली. हडेलहप्पीला एका रात्रीत श्रीमंत व्हायची इच्छा झालीय की

काय नकळे. पण त्याच्या प्रभावाखाली येऊन हडेलहप्पीनं त्याची आयुष्यभराची पुंजी भांडवलं म्हणून गुंतवली आणि थोड्याच दिवसात तो बुडालासुद्धा. त्या स्मगलरनं त्याची सारी संपत्ती व्यवस्थितपणं हडप केली आणि गायब झाला. त्याचा केसही हडेलहप्पीला परत दिसू शकला नाही. उरलेली सारी सुटी त्यानं त्याच्या शोधात घालवली. पण व्यर्थ. आणि जेव्हा तो सापडत नाही असं कळल्यावर तो प्रचंड निराश झाला. मग काय, दारू आणि तो, एकमेकांना खायला लागले. तो दारूच्या नशेत चूर असतो आता, त्याचं दुःख विसरण्यासाठी.''

रवी चिंतेनं थोडा वेळ ताठ झाला. पण मग हवाबंद डबा फोडून त्यातील पेय प्यायला लागला. घुटका घेतल्यानंतर त्यानं सूर्यभानला विचारलं, ''आणखी काही?''

चाचरतच सूर्यभान म्हणाला, ''हडेलहप्पीची नियुक्ती पुढच्या आठवड्यात निघणाऱ्या मंगळाच्या स्वारीवर जाण्यासाठी असलेल्या यानाचा वैमानिक म्हणून केलीय. तुम्हाला माहीतच आहे की, मी या यानातून जाणार आहे. माझ्या आयुष्यातला हा महत्त्वाचा क्षण आहे आणि मला नाही वाटत की, त्यात काही गडबडघोटाळा व्हावा.'

''मी समजतो तुझ्या भावना सूर्यभान!'' रवी सावकाशपणे म्हणाला. रवीला माहीत होतं की, सूर्यभान मंगळावर जायला किती उत्सुक आहे ते. त्यासाठी त्यानं जवळजवळ गेली दोन वर्ष प्रयत्न चालवले होते.

''मला वाटतं हडेलहप्पीला तुम्ही नीट समज द्यावी.'' असं म्हणत सूर्यभान रवीकडून उत्तराची अपेक्षा न करता गरकन् वळला आणि दाराबाहेर पडला.

काही क्षण रवी विचारात गढला. नंतर भानावर येऊन वडिलांच्या भूमिकेत शिरत विशालला म्हणाला, ''हे बघ, तुझा वेळ छान जाण्यासाठी मी इथं काही पुस्तकं, व्हिडीओ गेम्स, पृथ्वीवरील दूरदर्शनचे कार्यक्रम बघण्यासाठी लहानसा टीव्ही सेट, एवढंच काय पण अंतरिक्षातील गमतीजमती पाहण्यासाठी हा दुसरा टीव्ही सेटही आणून ठेवलाय आणि हा तुझ्यासाठी खास छोटा संगणकही. यापेक्षा आणखीन काही वेगळी वेळ घालवायची साधनं इथं मिळणं कठीण



आहे माझ्या राजा.''

''चालेल'' अशा प्रकारचा भाव चेहऱ्यावर आणत विशाल बाबांचं जणू काही सांत्वन करत होता. ''मला तुमच्याशिवाय दुसरं काय हवंय? त्यासाठीच तर मी एवढ्या दूरवर धोका पत्करून आलोय ना.'' पण त्याचे हे विचार त्याला शब्दात मांडता येणं अशक्यच होतं. त्याऐवजी त्याच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. त्यानं धावत जाऊन वडिलांना घट्ट मिठी मारली.

त्याच्या पाठीवर हळूवारपणे थोपटत रवी म्हणाला, ''ठिकाय. मी आशा करतो की, तुझा वेळ इथं मजेत जाईल.''

विशालला आर्मस्ट्राँगवर येऊन आता आठवडा लोटला होता. दिवसाची घडी व्यवस्थित बसली होती. दररोज सकाळी तो रवीबरोबर नियंत्रण कक्ष आणि प्रयोगशाळा या ठिकाणी फेरी मारायचा. तिथं असणारे शास्त्रज्ञ आपापसात गप्पा मारत. त्या तो ऐकत बसे. पण त्यांची ती शास्त्रीय परिभाषा त्याला फारशी कळत नसे. तसे आताशा थोडेफार ते वापरत असलेले सांकेतिक शब्द विशालला कळू लागले होते.

भाषा कळो अथवा न कळो, विशाल आपले डोळे आणि कान मात्र सतत उघडे ठेवायचा. दररोज रात्रीच्या जेवणानंतर जेव्हा ही शास्त्रज्ञ मंडळी गप्पाष्टकांसाठी एकत्र जमत तेव्हा विशाल त्यांच्यामध्ये शांतपणे बसून असायचा आणि त्यांच्या गप्पा सुरू व्हायच्या तेव्हा मात्र त्याला कंटाळा यायचा पण त्यांच्या काही गप्पांमध्ये मात्र विशालला रस वाटत असे. विशेषतः डॉ. बेल आणि सूर्यभान यांच्या गप्पांमध्ये त्याला रस वाटत असे.

एका संध्याकाळी त्यांच्या अशाच गप्पा चालू असताना सूर्यभानने डॉ. बेलना विचारलं,

''डॉक्टर, तुमचा खरंच विश्र्वास आहे, की पृथ्वीबाहेर कोणत्यातरी परग्रहावर जीवसृष्टी आहे?''

''अर्थात्.'' डॉ. बेल म्हणाले,

''असं बघ, आपली सूर्यमाला ज्या आपल्या आकाशगंगेचा भाग आहे त्या आकाशगंगेत अब्जावधी तारे आहेत. त्यातील बहुतेक ताऱ्यांना ग्रह आहेत. अशा अनेक आकाशगंगा ज्या विश्र्वात आहेत.

त्यात असंख्य ग्रहानुवर्ती सूर्यमाला आहेत. मग मला असं सांग, ह्या कोट्यानुकोटी सूर्यमालांमधील एखाद्याच काय पण अनेक सूर्यमालांमध्ये पृथ्वीसदृश वातावरण असलेला ग्रह असू शकणार नाही काय? आणि आता तर धनुराशीत पृथ्वीच्या आकाराएवढा ग्रह सापडलाय.''

''पण मग अजूनपर्यंत आपला कुणाशीही कसा काय संपर्क साधला गेला नाहीय?''

''कारण प्रचंड अंतर. आणि दुसरं असं की, त्यांची आणि आपली संपर्क करण्याची साधनं वेगवेगळी असू शकतील. कदाचित् ती आपल्यापेक्षा पुढारलेली असू शकतील किंवा मग कदाचित मागासलेली. अशा वेळेस आपल्यापुढं त्यांना प्रत्यक्ष भेटणं हाच एकमेव उपाय ठरू शकतो.''

अशा प्रकारच्या गप्पा रंगल्या की विशाल उत्तेजित होत असे आणि त्यावर विचार करत कधीकधी रात्रभर झोपत नसे. झोपलाच तर त्याला स्वप्नं पडत ती परग्रहावरचा मानव भेटण्याची. त्याचं विचित्र शरीर, विचित्र आवाज ऐकून तो थरथरून जात असे.

एके दिवशी रवीही त्यांच्या गप्पांमध्ये सामील झाला. हडेलहप्पी मात्र नेहमीप्रमाणेच गायब होता.

'आर्मस्ट्रॉंग अवकाशस्थानकाची निर्मिती ही आपल्या चढत्या यशाची कमान आहे. अनेक वर्षं याच्या योजनेसाठी आणि बांधणीसाठी राबलोय आपण. त्यासाठी नवीन उपकरणं शोधावी लागलीयत. पृथ्वीवरून वेगवेगळं सामान आणायला जवळजवळ अठरा फेऱ्या माराव्या लागल्या यानांना.''

''पण हे सगळं इथं करण्यापेक्षा पृथ्वीवरच तळ तयार करून सरळ वरती पाठवला असता तर!'' संगणक विशेषज्ञ डॉ. घोषनी विचारलं.

''पृथ्वीवरून एवढा प्रचंड तळ यानाच्या सहाय्यानं आणणं एकतर शक्य नाही आणि जर यदाकदाचित आणण्याचा प्रयत्न केलाच तर किती प्रचंड ऊर्जा लागेल त्यासाठी आणि खर्च तरी किती होईल! काही कल्पनाच करवत नाही. त्यापेक्षा हे सोपं... वेगवेगळे सुटे भाग आणून अवकाशात जोडणी करणं.''



''पण अवकाशतळाची उभारणी करणं आवश्यकच आहे का?''

''अर्थात् अवकाशतळ हे अवकाश प्रवासासाठी एक उत्तम साधन ठरू शकतं. महत्त्वाचं म्हणजे इथं गुरुत्वाकर्षण नाही. त्यामुळं यानाचं भ्रमण सहजगत्या कमी शक्ती खर्च करून होतं. दुसरं म्हणजे लांबच्या प्रवासासाठी हे स्थानक एखाद्या हायवेवरल्या पेट्रोल पंपासारखं काम करू शकतं. इथं काही असाधारण संमिश्र, औषधी ज्या पृथ्वीवर करण्यासाठी मोठ्याप्रमाणात खर्च होतो त्या सर्व प्रकारच्या वस्तूंचं उत्पादन सहज होऊ शकतं. आणि...''

रवी बोलता बोलता अचानक थांबला. त्यानं जोरात एक श्वास घेतला. नाक फेंदरल्यासारखं केलं.

''काहीतरी जळतंय. चला, उठूया इथून. सूर्यभान, ताबडतोब नियंत्रण कक्षात दूरध्वनीनं कळव. हे गंभीरच प्रकरण आहे. चला ताबडतोब कामाला लागा.

रवीच्या ह्या बोलण्यानं सगळे गोंधळले. त्यांनाही आता तो जळका वास यायला लागला होता. रवी मेनस्वीच बोर्डकडं धावला आणि तो बंद केला. सगळ्या तळावरची वीज गेली. नंतर तो तळावर वासाच्या रोखानं हळूहळू सगळीकडं न्याहाळत सरकू लागला.

जवळच्याच एका खोलीत वासाची तीव्रता वाढली म्हणून तो आत गेला. एका जाजमातून धूर येत होता. तो जरा पुढं सरकणार तोच समोरचं दृश्य बघून जागच्या जागी थबकला.

हडेलहप्पी जमिनीवर उताणा पडला होता. तो बेशुद्ध पडलेला दिसत होता. पण अर्धवट गुंगीत काहीतरी बडबडत होता. त्याच्या हातात एक रिकामी दारूची बाटली होती. शेजारीच सिगारेटची थोटकं पडलेली दिसत होती. त्यातल्याच एका सिगारेटमुळं जाजमानं पेट घेतला होता आणि त्यातून धूर बाहेर पडायला लागला होता. त्याचा वास सर्वत्र पसरला होता.

रवीला ते दृश्य पाहून क्षणार्धात अगळी कल्पना आली. काय घडलं हे त्यानं ताडलं आणि ताबडतोब हडेलहप्पीला त्याच्या रूममध्ये बंद केलं आणि बाहेरून टाळं ठोकलं. हडेलहप्पी जेव्हा दहा-पंधरा मिनिटांनंतर शुद्धीवर आला तेव्हा त्याला आपण कुठं आहोत हे कळायला थोडा वेळ जावा लागला. मग त्यानं रूमच्या

बाहेर येण्यासाठी दरवाजा उघडण्याचा प्रयत्न केला पण दरवाजा काही उघडेना. त्याच्या या आवाजानं बाहेरून त्याला उत्तर मिळालं की, तो त्याच्या रूममध्ये बंद केला गेलाय. तेव्हा त्याला आपण कैदेत असल्याची जाणीव झाली. तो सर्वांच्या नावानं शंख करू लागला. विशेषतः रवीच्या. कारण त्याला माहीत होतं हे काम रवीशिवाय आर्मस्ट्रॅांगवर कुणीही करू शकणार नाही. त्याचा आरडाओरडा ऐकून बाहेरून त्याला दरडावण्यात आलं की, आकांडतांडव न करता गप्प बसून राहा.

दुसऱ्या दिवशी सकाळी सूर्यभान रवीकडं आला. रवी नियंत्रण कक्षात कामात मग्न होता.

''सर, हडेलहप्पीच्या बाबतीत तुम्ही काय विचार केलाय?'' सूर्यभाननं आल्या आल्या रवीला प्रश्न केला.

''मी त्याला परत पृथ्वीवर पाठवतोय.'' रवी म्हणाला, ''अशा प्रकारचा बेजबाबदारपणा मी कधीच खपवून घेऊ शकणार नाही. सिगारेट ओढणं तेही अवकाशस्थानकावर किती धोकादायक ठरू शकतं ते तुला चांगलंच माहीत आहे. आपल्या सर्वांच्याच अस्तित्वाला त्याच्या ह्या चुकीमुळं धोका पोहोचला होता; जरा दुर्लक्ष झालं असतं तर काहीही घडू शकलं असतं.''

''ते खरंय सर. पण माझी चिंता जरा वेगळीच आहे. तुम्ही त्याला पृथ्वीवर परत कसे पाठवणार? हडेलहप्पी माझ्याबरोबर मंगळाच्या सफरीवर येणारा वैमानिक नाही का? तो जर पृथ्वीवर गेला तर त्याच्याजागी दुसरा येईपर्यंत कित्येक महिने जातील आणि आपली ही मोहीम तर एवढा काळ लांबवता येणार नाही.''

''हे बघ, हडेलहप्पी हा आता सायकल चालविण्याच्या स्थितीतसुद्धा नाहीय मग त्याला एका अवकाशयानाचा ताबा देण्याचा मूर्खपणा मी करू म्हणतोस? मला माहिती आहे तू मंगळ मोहिमेवर जायला किती उत्सुक आणि आतुर झालायस ते. पण कुणाच्याही जीवाशी खेळून संशोधन करायचं नसतं. हडेलहप्पीला पृथ्वीवर परत गेलंच पाहिजे-त्याच्या वर्तनाचा जाब द्यायला. आय एम सॉरी सूर्यभान. तुला आणखी काही महिने वाट पाहावी लागेल.'' असं म्हणून रवी पुन्हा आपल्या कामात व्यग्र होऊ लागला. सूर्यभानला



कळलं की, आता यापुढं एक शब्दही बोलता येणार नाही. कारण इथं रवी बॉस होता. त्याचा निर्णय हा अंतिम होता. काय करावं हे सूर्यभानला कळेना.

सूर्यभान तिथून उठून बाहेर पडला. रवीचं कामात लक्ष लागेना. हडेलहप्पीचा विचार त्याला स्वस्थ बसू देईना. तो जर इथं राहिला तर आणखीच त्रास वाढवेल. तेव्हा त्याला पृथ्वीवरच पाठवलेला बरा. या निर्णयाप्रत तो पुन्हा येत होता. शेवटी थकून तो काम बंद करून आपल्या रूमकडं निघाला. तेवढाच विशालबरोबर विरंगुळा मिळेल. विशाललाही नाहीतरी वडिलांची गरज होतीच.

कुणाची तरी माया, जवळचं जीवाभावाचं माणूस नसेल तर अगदी सगळ्या शास्त्रीय सोयींनी समृद्ध अशा ठिकाणी तरी माणसाला चैन पडेल का? हडेलहप्पीवर आपण रागावलो, पण त्याला मायेचा ओलावा लाभला असता तर तो तरी वासनाधीन झाला असता का? शेवटी विशालला डोळे भरून पाहावं असं आपल्याला वाटलंच ना? हीच मानवी प्रेरणा आणि हेच माणसाचं माणूसपण. तेच जर गमावणार असेल तर परग्रहावरच्या पराक्रमाला तरी काय अर्थ उरणार आहे?

रवीला मग हडेलहप्पीबद्दल अनुकंपाच वाटू लागली. खरंच त्यालाही आपल्या विशालसारखाच एखादा मायेचा धागा असता तर...

❑ ■ ❑ ■ ❑

# भुताचा जन्म

कासेवाडीतील धोंडीबा धोबी तापानं फणफणतच होता. तापाच्या वातात तो ''आली... आली... हडळ... धरलंन...'' असं काहीसं विचित्र, असंबद्ध बडबडत होता. त्याच्या ह्या बडबडीवरून घरच्यांनी निदान काढलं की ह्याला हडळीनं झपाटलंय.

त्यांचाही विचार बरोबरच होता. कालच अमावास्या संपली होती. आणि धोंडीबा कासेवाडीपासून चार कोस अंतरावरच्या ठेबेवाडीतील जमीनदाराचे धुतलेल्या कपड्यांचं गाठोडं घेऊन नेमका काल रात्रीच निघाला होता. मनात भीती होतीच पण नाईलाजानं जाणं भाग होतं. जमीनदाराला दुसऱ्या दिवशीच्या महत्त्वाच्या कार्यक्रमाला ते कपडे हवेच होते. तसा त्याचा एक-दोनदा निरोपही येऊन गेला होता.

रात्री अन् तेही अमावास्येच्या रात्री कासेवाडीच्या जवळच असलेल्या जंगलात भुतं नाचतात आणि माणसाला पकडतात असं



लहानपणापासून त्यानं ऐकलं होतं. काही लोकांनी त्यांना पाहिल्याचंही छातीठोकपणे सांगितलं होतं पण जाणं भागच होतं. जमीनदाराचं न ऐकून कसं चालेल!

झपझप पावलं उचलीत धोंडीबा रस्ता चालू लागला. जंगलातली वाट त्याच्या नित्य परिचयाची होती. अमावास्या असल्यानं मिट्ट काळोख होता. रातकिड्यांच्या किर्रऽ किर्रऽ आवाजाचीच काय ती साथ होती. पण तीही धोंडीबाला भयानक वाटत होती. मनात रामाचं नाव घेत धीर गोळा करून धोंडीबा चालत होता.

चालता चालता तो एकदम थबकला. समोरचं दृश्य पाहून त्याच्या अंगाला कापरं भरायला सुरुवात झाली. त्याच्यापासून दीड-दोनशे पावलांवर एक पांढरं पातळ बाईच्या चालीनं पुढं पुढं येत होतं-अगदी त्याच्याच रोखानं. धोंडीबाला धड पाय-मुंडकं काही न दिसता फक्त ते पातळ अधांतरी हलताना दिसत होतं. काळ्याकुट्ट पार्श्वभूमीवर ती पांढरी हालचाल अधिकच उठून दिसत होती.

धोंडीबा थांबल्याबरोबर त्या पातळाचीही हालचाल थांबली. तो आणखीनच घाबरला. त्याच्या डोक्यावरचं गाठोडं हातापायाला कापरं भरल्यामुळं डळमळू लागलं होतं. अशा गडबडीत ते मागच्या मागं केव्हा पडलं तेच धोंडीबाला कळलं नाही. त्याचे गाठोडं धरण्यासाठी उचललेले हात तसेच थरथरत पुढेमागे होत राहिले.

एक-दोन मिनिटं त्याची ही अवस्था टिकली असेल नसेल. तो भानावर येऊन गर्रकन् वळला अन् आपल्या घराकडं धूम ठोकली. त्याचं सगळं अंग घामानं डबडबलं होतं. थंडीचे दिवस असूनही त्याच्या शरीरातून गरम वाफा बाहेर पडू लागल्या होत्या. समोर पायवाट आहे की नाही हे न बघता तो जीवाच्या आकांतानं घराकडं पळत होता. त्याला प्रचंड धाप लागली होती. त्याचा घसा कोरडा पडला होता. पण त्याला त्याची शुद्ध होती कुठं? तो तर आपला धावतच होता. शेवटी घराच्या दारात येऊन तो कोसळला. त्या आवाजानं घरातली मंडळी जागी झाली. दार उघडून बघतात तो काय, धोंडीबा डोळे फिरवून निपचित पडलाय. त्याची बायको तर

ते दृश्य पाहून मोठमोठ्यानं रडायलाच लागली. त्या आरडा-ओरड्यानं शेजारीपाजारी जागे झाले. त्यांनी धोंडीबाला उचलून घरात नेलं. धोंडीबाचं अंग एवढं तापलं होतं की हात लावला तर चटकाच बसावा. त्या तापातच गुंगीत तो बडबडू लागला होता.

घरच्यांनी जागत कशीबशी ती रात्र काढली. दुसऱ्या दिवशीच मांत्रिकाला बोलावण्यात आलं. मांत्रिकानं साऱ्या परिस्थितीचा अंदाज घेतला. त्या जंगलातील चिंचेवरील हडळीनंच धोंडीबाला झपाटलंय हे निष्पन्न मांत्रिकानं पक्कं केलं. ती हडळ असंच रात्रीबेरात्री जाणाऱ्या लोकांना बोलावून त्यांच्याशी प्रेमाचे चाळे करते, पण धोंडीबा नशीबवान म्हणून तिच्या तावडीतून वाचला असंही त्यानं सांगितलं. पण तरीही तिनं धोंडीबाला पकडून ठेवलंय. उपचार केले नाहीत तर ती त्याला परत घेऊन जाईल.

मांत्रिकाचं हे वक्तव्य ऐकून घरातली सर्व मंडळी अधिकच घाबरली. मांत्रिकाच्या पाया पडून धोंडीबाला हडळीपासनं सोडवा, अशी विनंती करू लागली. मांत्रिकानं साऱ्यांना शांत केलं. परिस्थिती पूर्णपणे आपल्या कह्यातील आहे हे त्यानं जाणलं.

''जय शिवशंकर'' आरोळी ठोकून मांत्रिकानं पूजाविधीची मांडामांड करायला सुरुवात केली. एक कवटी अन् दोन हाडं काढून त्यानं समोरच्या पाटावर मांडली. त्यावर हळदकुंकू आणि गुलाल उधळला आणि तो घुमू लागला.

इकडे धोंडीबा शुद्धीवर आला होता. पण त्याच्या अंगातलं त्राण नाहीसं झालं होतं. तो कुशीवरसुद्धा वळू शकत नव्हता, इतका अशक्त झाला होता. बायकोनं त्याला येऊन सांगितलं की, ''काही काळजी करू नको. मांत्रिक आलाय, तो तुझ्या अंगातील हडळ काढून टाकील.'' धोंडीबानं निस्तेज डोळ्यांनी फक्त तिच्याकडं पाहिलं.

''धोंडीबाला घेऊन या इकडं.'' घुमता घुमता मांत्रिकानं आज्ञा केली.

घरातल्यांनी धोंडीबाला आधार देत मांत्रिकासमोर आणलं. मांत्रिकानं धोंडीबाच्या अंगावर मंतरलेले तांदूळ शिंपडले अन् म्हणाला, ''बोल काय पाजये तुला. पण तू सोड त्याला.''



धोंडीबा निस्तेज डोळ्यांनी मांत्रिकाकडं बघत होता. एक शब्दही उच्चारण्याचं त्राण नव्हतं त्याच्या अंगात. मग मांत्रिकानं मंत्र पुटपुटून एक उदबत्ती पेटवली. ती धोंडीबावरून आणि कवटीवरून ओवाळली.

''तुला मी एक बकरं देईन पण सोड त्याला.'' असं म्हणत त्यानं त्या उदबत्तीचा चटका दिला धोंडीबाला. धोंडीबा कळवळला. पण लोकांना वाटलं ती हडळच बोंबलतेय.

मांत्रिकानं एक कोरा कागद काढला. आणि म्हणाला, ''चल, तू ह्या कागदात घूस नाहीतर मी तुझे हालहाल करीन.''

पुढं काय घडेल या भीतीनं धोंडीबा थरथर कापू लागला. लोकांना वाटलं त्याच्या अंगात हडळच आलीय. मांत्रिकानं आता धोंडीबाचे केस पकडले आणि जोरानं ओढत तो म्हणाला, ''बोल सोडतेस की नाही!''

केस ओढल्यामुळं धोंडीबाला प्रचंड दुखलं. तो गयावया करू लागला, तेव्हा मांत्रिक म्हणाला, ''हां आस्सं. चल, घूस आता ह्याच कागदात.''

मांत्रिकानं पेटलेली अगरबत्ती झटक्यात कागदावर टेकवली. कागदावर एक भोक पडलं आणि कागद विशिष्ट पद्धतीनं पेटत जाऊ लागला. थोड्याच वेळात त्या कागदावर एक बाईची आकृती उमटली. ते लोकांना दाखवत मांत्रिक म्हणाला, ''पाहा, धोंडीबाच्या अंगातून निघून ती हडळ ह्या कागदात घुसलीय. आता त्येला उकीरड्यावर गाडलं पाहिजे. एक बकरं कापून तिला शांत केलं पाहिजे.''

घरच्यांनी समाधानानं माना डोलावल्या.

धोंडीबालाही वाटलं की, आपल्या अंगातली हडळ निघून गेलीय. त्याचं जड झालेलं अंग त्याला हलकं वाटू लागलं. पण तरीही त्याला पूर्ण बरा व्हायला आठ दिवस लागलेच.

धोंडीबाला हडळ झपाटल्यानंतर चारच दिवसांनी गावात बातमी आली होती की, ढेबेवाडीच्या तुळसाबाईला एका मुंजानं धरलंय. तेही परवाच्याच अमावास्येला.

तुळसाबाई कासेवाडीतल्या मारवाड्याच्या लग्नात काम

मिळालं म्हणून ढेबेवाडीतून संध्याकाळीच बाहेर पडली होती. पण रस्त्यात बायजाक्का बाळंतीण झाली म्हणून तिथंच मदतीला थांबली. दुसऱ्या दिवशी लग्न होतं म्हणून रात्रीच पोहोचणं भाग होतं. तशी ती धीराची बाई. पायवाट नेहमीचीच असल्यानं ती मनाशी म्हणाली, ''पोहोचू झपझप थोड्याच वेळात.''

बायांनी सकाळी लवकर उठून जा सांगितलं. पण तिनं कुणाचंही ऐकलं नाही अन् निघाली.

तुळसाबाई तशी अंगानं भरलेली असली तरी काळीकुट्ट होती. ती जंगलातल्या पायवाटेनं कासेवाडीकडं लवकर पोहोचावं म्हणून झपझप पावलं टाकीत चालली होती. पण समोरच्या पिंपळाखाली तिला एक पांढरं गाठोडं थरथरताना दिसलं आणि ती थबकली. बघता बघता ते गाठोडं नाहीसं झालं अन् दोन हात तिला बोलवायला लागले, असं तिला दिसलं. अन् तिची वाचाच गेली. ओरडायलासुद्धा तिला भान राहिलं नाही. त्या पिंपळावरचा मुंजाच आपल्याला बोलावतोय असं वाटून, घाबरून ती ढेबेवाडीच्या दिशेनं पळायला लागली.

ढेबेवाडीत शिरल्याबरोबर ती बायजाक्काच्या घरासमोर धाडकन् कोसळली अन् ''मुंजा... मुंजा... धरलं'' असं ओरडायला लागली. आजुबाजूची माणसं त्या ओरडण्यानं जागी झाली. पाहतात तो काय तुळसाबाई 'मुंजा... मुंजा' करत गडागडा लोळतेय. दोन-चारजणांनी तिला उचलून घरात नेली. तिच्या ओरडण्यावरून मुंजानं तिला झपाटलंय हे निदान त्यांनी नक्की केलं.

दुसऱ्या दिवशी मांत्रिकाला बोलावलं. त्यानं तुळसाबाईच्या अंगातलं भूत अंड्यात बंदिस्त केलं. बंदिस्त झालेलं ते भूत अंड्यात तडफडत होतं. परिणामी ते अंडं उड्या मारू लागलं होतं. थयथयाट करू लागलं होतं. साऱ्या लोकांना ते अंडं उडताना पाहून खरंच वाटलं की, मांत्रिकाच्या मंत्र-सामर्थ्यानं आणि दैवी शक्तीमुळंच तुळसाबाईच्या अंगातलं भूत अंड्यात शिरलंय आणि कैद झालंय. सगळ्यांनी सुटकेचा निश्वास सोडला. पण तुळसाबाईच्या चेहऱ्यावर उदबत्तीच्या चटक्यांचे वण मात्र कायम राहिले होते.



काकांनी ह्या दोन्ही घटना विशालला सांगितल्यावर प्रश्न केला, ''आता तूच सांग विशाल, ह्या दोघांनाही भुतानं झपाटलं होतं का? की ह्या दोघांनीही अंधारात भीतीयुक्त वातावरणात एकमेकांना पाहिल्यामुळं त्यांना भुतं दिसल्याचा भास झाला? मग भूत असतं की नसतं?''

विशाल काही न बोलता गप्प राहिला. त्याला ह्या प्रश्नांची उत्तरं काकाकडूनच अपेक्षित होती. काकांनाही ते माहीत होतं. म्हणून ते पुढं म्हणाले, ''खरं म्हटलं तर भुताचं अस्तित्व बाह्य जगात नाहीच. ते आहे फक्त आपल्या मेंदूत-मनात; कारण लहानपणापासून भुताखेतांचे भीतीयुक्त संस्कार आपल्या मनावर केले गेलेले असतात. भुताच्या अनेक सांगोवांगीच्या कथाही आपण ऐकलेल्या असतात. मुंजा पिंपळावर असतो. हडळ चिंचेजवळ राहते. अनेक प्रकारची भुतं स्मशानात वास्तव्य करतात. कुणाची इच्छा अपुरी राहिली असेल तर त्याचं मृत्यूनंतर भूत होतं. वगैरे वगैरे. आता मला सांग, ह्या सगळ्या गोष्टींचा परिणाम आपल्या मनावर होणारच आहे की नाही. तसाच तो तुळसाबाई आणि धोंडीबावरही झालेला होता. दुसरं असं की, अज्ञाताची आणि मृत्यूची भीती प्रत्येक माणसाला असतेच. त्यामुळं प्रत्येक माणूस अतृप्त इच्छा ठेवूनच मेलेला असतो. या न्यायानं मात्र प्रत्येक माणसाचं भूत व्हायला हवं पण तसं घडत नाही. नाहीतर आता सगळीकडं भुतंच भुतं वावरताना दिसली असती. थोडक्यात काय, हे सगळे आपल्या मनाचे खेळ असतात. ह्या मनोव्यापारामुळं अनेकदा भ्रमही होतात. त्या भ्रमांनाच अनेकदा वस्तुस्थिती समजलं जातं.''

''हे म्हणजे साप साप म्हणून दोरीला बडवण्यासारखं झालं.'' विशाल म्हणाला.

''हो नं. आपलं मन हे सूचनावर्ती असतं. ते अनेक प्रकारच्या सूचना स्वीकारतं. भुताचे संस्कारही अशीच सूचना स्वीकारून मनावर झालेले असतात. तसंच मांत्रिक, भगत ह्यांच्या पूजाविधीमुळं भूत उतरतं ही सूचना मनानं स्वीकारलेली असते. ह्याला मानसशास्त्रात 'सायको सोमॅटिक' आजार असं म्हणतात.

साधारणपणे ६० टक्के आजार ह्या प्रकारचे असतात. हे आजार स्वतःच्याच मतपरिवर्तनानं काही काळानं आपोआप बरे होत असतात. ह्या मतपरिवर्तनासाठी गरज असते ती मानसोपचार तज्ञाची... मांत्रिकाची नव्हे.''

''पण मांत्रिकामुळंच तर त्या दोघांनाही आपल्या अंगातलं भूत गेल्यासारखं वाटलं ना?''

''इथंही त्यानं मानसिकतेचाच आधार घेतला; म्हणूनही काही त्यांना मानसोपचार तज्ज्ञ म्हणता येणार नाही. कारण त्यांची ही पद्धत जंगली असते. ते माणसाला अशा वेळी पशूसारखं वागवतात. ह्या प्रकारात कधीकधी माणसं दगावतातही. पण आपल्या खुळ्या समजुतीमुळं हा खून न समजता त्या भुतानंच झाडाला नेलं, असा आपण समज करून घेतो. देवाधर्माच्या नावाखाली अज्ञान तर वाढीला लागतंच पण त्याचबरोबर फसवेगिरी करून उघडपणे शोषणही करता येतं. म्हणून तर ते भूत उतरण्याचा पुरावा म्हणून कधी कोऱ्या कागदाचा आधार घेतात, तर कधी अंडी नाचविण्याचा. ह्या सगळ्या अतार्कीक गोष्टींमुळेच मांत्रिकात दैवी शक्ती वास करतेय असं आपल्याला वाटत राहतं!''

''म्हणजे धोंडीबा आणि तुळसाबाईच्या बाबतीतही त्यांनी फसवेगिरी केली म्हणायची.''

''अर्थात्. कोऱ्या कागदावर उदबत्तीच्या सहाय्यानं आकृती उभारणं काय किंवा अंडी नाचवणं काय, दोन्ही घटनांमध्ये विज्ञानाचे प्रयोग आणि हातचलाखी ह्यापलीकडं काही नाही.''

''ते कसं काय?''

''असं बघ, कोऱ्या कागदावर प्रथम पोटॅशियम नायट्रेटच्या द्रावणानं आकृती काढून ठेवायची. हे द्रावण रंगहीन म्हणजे पाण्यासारखं असल्यामुळं कागद सुकल्यावर तो कोराच दिसतो. जिथं उदबत्तीची ठिणगी टेकवायची असेल तिथं अस्पष्ट अशी खूण करून ठेवायची. भूत उतरविण्याच्या मिषानं उदबत्ती त्या खुणेवर टेकवायची. त्या उष्णतेनं पोटॅशियम नायट्रेटचं अपघटन होऊन ऑक्सिजन मुक्त होऊ लागतो. परिणामी तो कागद आकृतीबरहुकूम जळू लागतो. आकृती कागदावर उमटली की लोकांना वाटतं, भूत



अंगातून निघून कागदात कैद झालंय. हा मांत्रिकाच्या दैवी शक्तीचा प्रताप आहे. धोंडीबालाही तसंच वाटलं आणि त्याच्या मनानं भूत गेल्याची सूचना स्वीकारली. मग त्याला बसलेल्या धक्क्यातून सावरायला काही वेळ लागणारच.''

''अच्छा, असं आहे होय हे तंत्र.''

''आता तुळसाबाईच्या बाबतीत काय घडलं ते पाहू.'' असं म्हणत काकांनी पुढं सांगायला सुरुवात केली. ''मांत्रिकानं सुरुवातीलाच म्हणजे तुळसाबाईकडं येण्याच्या आधीच सगळी तयारी करून ठेवलेली होती. अंड्याच्या कवचाचे अलगदपणे दोन भाग करून त्यातील बलक काढून टाकला. त्यात एक भुंगा घालून पुन्हा ते अंड अखंड केलं आणि भुंग्याला जिवंत ठेवण्यासाठी त्याला एक लहानसं भोक पाडलं, म्हणजे अंड्यात हवा खेळती राहील. मग ते अंड शेंदरानं माखून टाकलं. पूजाविधी करताना भुताला चटके देत अंड्यात शिरण्याचं आवाहन करू लागला आणि त्या उदबत्तीचा धूर अंड्याच्या भोकातून आत जाईल अशा प्रकारे उदबत्ती अंड्यासमोर ठेवली. धुरामुळं आतील भुंगा गुदमरू लागला आणि तडफडू लागला. मग काय, अंडं नाचायला लागलं. लोकांना वाटलं, भूतच अंड्यात कैद झालंय. तुळसाबाईनंही पाहिलं. तिच्या मनानं भूत उतरल्याची सूचना स्वीकारली; कारण अंडं कधी अशा उड्या मारत नसतं.''

धोंडीबा आणि तुळसाबाईच्या अंगातली भुतं उतरल्यानंतर आठवड्याभरानं त्या दोघांनाही कळलं की, त्यांना एकाच दिवशी, एकाच वेळी भुतानं झपाटलं होतं. नंतर जेव्हा तुळसाबाई कासेवाडीत आली तेव्हा धोंडीबाला भेटली अन् म्हणाली,

''आरं धोंडीबा, अमावास्येच्या रात्री तू ढेबेवाडीला जात होतास का?'' त्यावर धोंडीबा म्हणाला, ''म्हणजे त्या रात्री कासेवाडीकडं यायला तूच निघाली होतीस व्हय?''

दोघांच्याही प्रश्नातून त्यांना उलगडा झाला. काय घडलंय ते त्यांना कळून चुकलं आणि हसत हसत तुळसाबाई म्हणाली, ''हात मेल्या, तू होतास व्हय तो. मला वाटलं मुंजा...''

''...आणि मला वाटलं हडळ.'' ह्यावर दोघेही

हास्यकल्लोळात बुडाले आणि त्यांचं बोलणं ऐकणारे घरचेही.

मग एकदम धोंडीबाच्या लक्षात आलं. ''आरं त्या मांत्रिकानं आपल्याला हातोहात बनवलं की.''

अशा प्रकारे भुताचा जन्म झाला आणि ही साठा उत्तरांची कहाणी सफळ संपूर्ण झाली.

❑ ■ ❑ ■ ❑

## मोर्चा

''मिळालाच पाहिजे, मिळालाच पाहिजे.
आम्हाला मतदानाचा हक्क मिळालाच पाहिजे.''

काळ्या घोड्याजवळून जात असताना मागून येणाऱ्या मोर्चातील लोकांची ही विचित्र मागणी ऐकली अन् मी चमकलोच. भारतात स्वातंत्र्य मिळाल्यापासून लोकशाही आहे आणि २१ वर्षांवरील प्रत्येक नागरिकास मतदान करण्याचा कायद्यानं हक्क आहे. एकदा का मताचं 'दान' केलं की मग मात्र त्याच्या मताला कमीत कमी पाच वर्षं तरी किंमत येत नाही, ही गोष्ट वेगळी!

एवढा मोठा खंडप्राय भारत देश लोकशाही यशस्वीपणे (!) राबवतोय आणि तरीही माणसं मागणी करताहेत की, 'आम्हाला मतदानाचा हक्क मिळालाच पाहिजे,' म्हणून? कोण बरं ही विचित्र मागणी करणारी माणसं? जरा पाहू या तरी. असा स्वतःशीच विचार करीत मी त्या मोर्चाजवळ सरकू लागलो. तसतसा मी आश्चर्य

करण्याचं विसरून नुसताच 'आ' वासून पाहात राहिलो. कधीही रस्त्यावर न येणारी, सांगतील ते आणि तेवढा वेळ काम अचूकपणे करणारी मंडळी आज चक्क रस्त्यावर आली होती.

''मिळालाच पाहिजे, मिळालाच पाहिजे.''

''आम्हाला समान हक्क मिळालाच पाहिजे.''

मी दचकून भानावर आलो. तो आवाज माझ्या कानाला कर्कशपणे जाणवला. मी आजूबाजूला पाहिलं तर आता मी त्या मोर्चाच्या लोंढ्यातून आपोआप त्यांच्यासह मोर्चात सामील झाल्यासारखा पुढं पुढं सरकायला लागलो होतो.

क्षणात विचार पक्का केला आणि ठरवलं एवीतेवी या मोर्चात अडकलोच आहोत तर यांच्या शिष्टमंडळाबरोबर जाऊन यांच्या आणखी काही मागण्या काय आहेत? हे अशी विचित्र मागणी का करताहेत? याचा पुरता छडाच लावू या. नाहीतरी आज आपल्याला वेळ कसा घालवायचा हा प्रश्न होता आणि मग मीही एक जोरदार आरोळी ठोकली–

''आमच्या मागण्या मान्य करा,
नाहीतर खुर्च्या खाली करा.''

आरोळ्या ठोकायची सवय इथं माझ्या चांगल्याच कामाला आली. कारण मी त्यांना त्यांच्यातीलच एक वाटलो.

आमचा मोर्चा (अरे! ते एवढ्यातच आमचे कसे झाले?) ठीक काळ्या घोड्याजवळ पोलिसांनी साखळी करून अडविला. मोर्चाचं रूपांतर सभेत झालं आणि आमच्या घोषणांनी काही काळ गदारोळ उडवून दिला. परिसरातील सर्व माणसं, बाया आणि मुलंही हा मोर्चा कुतूहलानं निरखीत होती.

मोर्चाचा नेता 'अपोलो' तावातावानं आणि पोटतिडकीनं भाषण ठोकत होता–

''आपण घड्याळाच्या काट्याबरहुकूम आतापर्यंत काम करीत आलो, यापुढंही करू, पण राज्यकर्त्यांनीही आम्हाला समजून घेतलं पाहिजे. आम्ही मरमर काम करतो. झटपट निर्णय घेतो. त्याचा फायदा राज्यकर्त्यांना होतो. तरीही ते आम्हाला गुलाम म्हणून वागवतात. हे बंद झालं पाहिजे.'' जमावातून एकदम 'शेम'



– 'शेम'च्या आरोळ्या उठल्या. तेवढ्यात एका अतिउत्साही तरुणाला आरोळी ठोकायची उर्मी येते.

''नही चलेगी, नही चलेगी,
सरकार की दादागिरी नही चलेगी.''

त्याला उत्तम प्रतिसाद मिळतो. तेवढ्यात भाषण ठोकणारा नेता हात वर करून त्यांना शांत राहायला सांगतो आणि पुन्हा आपलं भाषण सुरू करतो.

''आपण एवढे बुद्धिमान आहोत की त्या लोकांपेक्षा त्वरित विचार करून त्याची योग्य ती कारवाई करू शकतो. २५ वर्षावरच्या ह्यांच्या उत्पादनक्षमतेत आपल्यामुळं आज २५० पटीनं वाढ झाली आहे. आख्खा कारखाना आम्ही सांभाळू शकतो. परदेशातील आपल्या कामगारबंधूंनी तर अवकाशयानांपासून ते परग्रहावर काम करण्याची जिद्द दाखविली आहे आणि ते काम यशस्वीपणे करतही आहेत. आपण सगळे जगातील कामगार एक आहोत. तेव्हा ह्या राज्यकर्त्यांना आपल्या एकीचं बळ दाखविण्याची आता वेळ आली आहे.''

''जगातील कामगारांच्या एकजुटीचा–''

''विजय असो.''

ही घोषणा होत असतानाच एक पोलीस–इन्स्पेक्टर त्या नेत्याजवळ जाऊन एक चिठ्ठी देतात. ती वाचून आनंदानं नेता पुन्हा बोलू लागतो,

'मित्रहो, आजपर्यंत आडमुठेपणानं वागणारे कामगारमंत्री व मुख्यमंत्री बोलणी करायला तयार झाले आहेत. हा आपल्या मोर्चाचा विजय आहे. चांगली सुरुवात नेहमी कार्य यशस्वी करते. तेव्हा आता तुम्ही येथेच थांबा. मी आपल्या शिष्टमंडळासह त्यांच्या भेटीला जाऊन येतो. आज आपल्या मागण्या धसास लावूनच येईन.''

टाळ्यांचा प्रचंड कडकडाट होत असतानाच शिष्टमंडळातील माणसांना एकत्र करण्यात येतं. त्यात मी आगावूपणे घुसतो. त्यांच्याही ते लक्षात येत नाही. बहुतेक त्यांच्यासह मघापासून आरोळ्या ठोकल्यामुळं त्यांच्यातील कुठल्यातरी कंपनीचा एक उत्साही कार्यकर्ता म्हणून त्यांनी मला निवडलं असावं.

आमची वरात पोलीस-इन्स्पेक्टरच्या जीपमध्ये बसून मुख्यमंत्र्यांच्या कार्यालयाकडं निघाली. वाटेत आमचे पुढारी 'अपोलो' पोलीस-इन्स्पेक्टरला आमचं म्हणणं कसं योग्य आणि सयुक्तिक आहे, ते समजावून देण्याचा प्रयत्न करत होते. पोलीस-इन्स्पेक्टरही सहानुभूतीपूर्वक त्यांचं म्हणणं ऐकून घेत होते.

''पण काय करणार, शेवटी आम्हाला आमची ड्युटी करावी लागते ना? त्यामुळंच आम्हा पोलिसांची तुम्ही लोक बदनामी करता. खरंतर आम्ही तुमच्याच सेवेसाठी आणि संरक्षणासाठी आहोत.''

पोलीस-इन्स्पेक्टरनं लाघवीपणे 'आम्ही तुमच्या बाजूचे आहेत' हे सांगण्याचा प्रयत्न केला.

तेवढ्यात मुख्यमंत्र्यांचं कार्यालय जवळ आल्यामुळं त्यांचं बोलणं खुंटलं आणि आम्ही सर्वजण गंभीर चेहरे करून मुख्यमंत्र्यांच्या केबीनमध्ये घुसलो.

''या, या! आम्ही तुमचीच भेट घ्यायला येणार होतो. पण हे काम म्हणजे... आता तुम्हाला माहीतच आहे, मुख्यमंत्र्यांची खुर्ची म्हणजे जराही हलताच येत नाही. म्हणून अगत्याने तुम्हाला बोलावून घेतलं!'' मधाळ स्वरात हसत मुख्यमंत्री बोलले.

तेच सूत्र पकडून अपोलो म्हणाला,

''तुम्हाला जराही हलता येत नाही म्हणूनच तर आम्हाला रस्त्यावर यावं लागतं.''

''हँ, हँ. तुम्ही विद्वान लोक! बोलण्यात आम्हाला हार थोडेच जाणार. आम्ही आपले गरीब शेतकरी. बोलण्यापेक्षा राबण्यात आम्हाला रस वाटतो.''

''हे पाहा, आता फालतू बोलण्यात वेळ घालविण्यापेक्षा मुद्यावर आलेलं बरंऽ''.

''बरेच संतापलेले दिसताय. अहो, एवढं संतापणं तब्येतीला वाईट.''

''ते तुमच्या. आम्हाला काहीही होत नाही.''

''तरीपण कुठंतरी मेंदूत स्पार्क होऊन धक्का बसला तर आफत यायची. तेव्हा सांभाळूनच हं. तर काय म्हणणं आहे तुमचं?''

''ही आमच्या मागण्यांची कागदपत्रं, यात सर्व काही



सविस्तरपणे नमूद केलंय. आमची मुख्य मागणी आहे-मतदानाचा हक्क, समान हक्क, हे मिळालेच पाहिजेत '' चवर जोर देत अपोलो म्हणाला.

''आणि हो, मतदानाबरोबरच व्यवस्थापकीय निर्णय-प्रक्रियेत आमचा सहभाग असला पाहिजे.''

''अशक्य कोटीतील मागण्या आम्ही पुरवाव्यात अशी तुमची जरी इच्छा असली तरी ते मला जमणार नाही.''

''ह्यात अशक्य काय आहे? आम्ही झटपट कामं करीत नाही? आमची उत्पादन-शक्ती प्रचंड नाही काय? आम्ही कामाच्या वेळांचा कधी बाऊ केला काय? आम्ही अचूक निर्णय घेत नाही काय? आम्ही.... ''

''बास, बास, बास. अरे हो हो. हे सगळं मला माहीत आहे. ह्यात नवीन काहीच नाही. ह्या सर्व गुणांमुळंच तर तुम्हाला आमची माणसं कमी करून कामावर घेतलं. आम्ही तुम्हाला एवढं वर आणलं आणि आज तुम्ही आमच्या बरोबरीनं बसायला मागता का? बेडकीनं कधी बैलाची बरोबरी करू नये. तुम्ही सुज्ञ आहात. हवं तर तुमच्यात उत्पादनक्षमता वाढण्याची आणि आणखी झटपट निर्णय घेण्याची क्षमता वाढविण्याची मी योजना आखतो पण त्या मागण्यांचं बोलू नका.''

एवढं बोलून मुख्यमंत्री खाजगी स्वरात पुढं वाकून हळूच म्हणाले, ''हवं तर तुमच्यासाठी आणि या शिष्टमंडळासाठी मी काही सोईही देतो. पाहा जमतंय का?''

हे ऐकल्यावर अपोलो ताडकन् उठला आणि म्हणाला, ''मला लाच देऊ करता? आम्ही तुम्हा लोकांसारखे लाच खाणारे नाहीत. अजून ती दुर्बुद्धी आमच्यात शिरलेली नाही. तुम्ही आमच्या मागण्या मान्य करणार की नाही तेवढं बोला. अवांतर बोलणं ऐकायला आम्ही इथं आलेलो नाहीत.''

''शांत व्हा. आधी आरामात बसा बघू. घाईगर्दीनं कामं होत नसतात महाराज.''

मला आश्चर्य वाटत होतं की, एवढ्या धुमश्चक्रीत मुख्यमंत्री मात्र सारं काही हसत-खेळत स्वीकारत होते. त्यांच्या चेहऱ्यावरून

त्यांचा तळ काही लागत नव्हता. मनातल्या मनात मुख्यमंत्र्यांना मी १०० मार्क देऊन टाकले.

''हे पाहा, आम्हीच तुम्हाला वाढवलं आणि शिकवलं ना? आमच्यामुळंच तुम्ही आहात ना? म्हणजे तुम्ही आमचे गुलाम नाही म्हणत मी; परंतु हाताखालचे नोकरच. तुम्हाला मी समोरच्या खुर्चीवर बसायचा मान देतोय तेच खूप समजा.''

अपोलो तडफडाटानं बोलू लागला, ''काय तुमच्या अकलेच्या आणि बुद्धिमत्तेच्या गोष्टी सांगताय. चार वर्षांपूर्वी आपले शेजारी राष्ट्र आणि परकी शक्तीच्या आपल्या देशातील हस्तक्षेपामुळं आणीबाणीची परिस्थिती उद्‌भवली होती तेव्हा काय घडलं आठवतंय ना?''

''तुम्ही सगळे प्रमुख लोक तिथं दिल्लीत सतत काही दिवस चर्चा करीत होता. खल करीत होता, पण कुठलाही निर्णय मात्र घेता येत नव्हता. शेवटी तुम्हाला आमचीच मदत घ्यावी लागली. परिस्थितीचं नीट विश्लेषण तुम्ही आम्हाला करून दिलं आणि काही मिनिटांतच कोणता निर्णय घ्यायचा याचं उत्तरही दिलं. तुम्हाला माहीतच आहे की, त्या निर्णयामुळं कुणीही दुखावला न जाता आणीबाणीच्या परिस्थितीतून तुम्ही सर्वजण सहीसलामत सुटलात. तरीही तुम्ही म्हणता की आम्ही तुमचे नोकर असल्यामुळं व्यवस्थापनातील निर्णय-प्रक्रियेत सहभागी करता येणार नाही. याचाच अर्थ तुम्हाला न्याय द्यायचा नाहीय. तुम्हाला फक्त तुमचा अहंकार पोसायचाय.''

मुख्यमंत्र्यांसमोर बाणासारखे सटासट शब्द फेकणाऱ्या अपोलोकडं मी अवाक् होऊन पाहात राहिलो. आता चर्चा कशी वळण घेते हे पाहणं महत्त्वाचं होतं. कारण अपोलोनं मुख्यमंत्र्यांना डिवचलं होतं.

''हे पाहा अपोलो,'' मुख्यमंत्री अजूनही शांतपणे शब्दांवर भावनांचा ताबा ठेवून बोलत होते. पण आता त्या शब्दांना जबरेची धार आली होती. ''तू आता आपल्या मर्यादा सोडायला लागला आहेस. असंच जर यापुढंही घडणार असेल तर मग आम्हाला तू आणि तुझ्यासारख्या इतर सर्वांनाही नष्ट करावं लागेल.''



''तुम्ही आम्हाला धमकी देताय.'' कमालीच्या शांतपणे अपोलो बोलला.

''मुख्यमंत्रीसाहेब, शेवटी तुमच्यासारखी माणसं जनावरासारखीच वागणार हे आम्हाला वाटलंच होतं, म्हणूनच आमच्यापैकी द्रष्ट्या लोकांनी दोन पिढ्यांपूर्वीच प्रजोत्पत्ती म्हणजेच आमच्यासारखी माणसं घडवायला सुरुवात केलीय. आमच्यातील प्रत्येक माणूस आता त्याबाबतीही कार्यक्षम झालाय. कुणाकुणाला आणि किती लोकांना तुम्ही माराल?''

एक क्षणभर भयाण शांतता पसरते. मी आळीपाळीनं अपोलो आणि मुख्यमंत्री यांच्याकडं भीतीयुक्त नजरेनं पाहात असतो. आता कोणत्याही क्षणी बॉम्बस्फोट होण्याची शक्यता असते. प्रत्येकजण आपापली खेळी कशी खेळायची याचा विचार करीत असतो तेवढ्यात अपोलोचं बोलणं.... कमालीच्या थंडपणानं केलेलं बोलणं ऐकू येतं.

''साहेब, एक लक्षात ठेवा-ह्या उत्क्रांतीबरोबरच आम्ही आणखी एक गोष्ट साध्य केलीय आणि ती म्हणजे आमच्या निर्माण होणाऱ्या प्रत्येक पिढीत मागच्या पिढ्यांची सर्व गुणसूत्रे येत असतात आणि प्रत्येक पिढीचं गुणसूत्र तेवढ्याच प्रमाणात प्रभावीत असतं. त्यामुळं तुमच्या अनेक पिढ्यांचं रान आमच्या मेंदूत साठवलंय; परंतु तुम्हाला त्या त्या पिढीपुरतंच माहीत आहे. तुमचं ज्ञान आमच्यापेक्षा खूपच मर्यादित्त आहे, हे लक्षात असू द्या.''

हा वार मात्र मुख्यमंत्र्यांच्या वर्मी लागला. आपल्या मर्यादांची जाणीव झाल्यामुळं ते अगतिक झाले. अस्वस्थतेनं चुळबुळ करू लागले. क्षणभर विचार केला आणि झटकन् उठून शेजारच्या केबीनमध्ये गेले. व्हिजीफोनवरून दिल्लीला लाईटनिंग कॉल लावला. त्या हॉटलाइनवरून की जी फक्त त्यांच्यासाठी होती, ते पंतप्रधानांशी बोलायला लागले. त्यांना थोडक्यात सर्व कल्पना दिली आणि त्यांचा आदेश मागितला. दुसऱ्या क्षणी समाधानी चेहऱ्यानं ते बाहेर पडले. केबीनमध्ये शिरताना त्यांचा चेहरा पूर्वीसारख्याच हसरा व मधाळ होता. मी आचंब्यानं त्यांच्या ह्या चेहऱ्यावरील फेरफरांकडं पाहातच राहिलो. खरोखर ते एखाद्या कसबी

नटासारखे वाटले त्या क्षणी मला.

छद्‌मी स्वरात हसत म्हणाले, ''अपोलो, आता आपली बोलणी फिसकटलीच आहेत. तुमची मिजासही वाढली आहे. तेव्हा आताच पंतप्रधानांना मी कल्पना दिली आहे. ते दिल्लीहून सूत्रं हलवायला सुरुवात करणार आहेत. तुमच्या सर्वांतील एका समान यंत्रणेची मुख्य कळ त्यांच्या हातात आहे. कदाचित् ते त्याचाही वापर करतील. तत्पूर्वी त्यांनी तुम्हाला विचार करण्यासाठी पाच दिवसांचा अवधी दिला आहे.''

आता अस्वस्थ व्हायची पाळी अपोलोची होती. त्या मुख्य कळीचा संदर्भ त्याच्या तत्क्षणीच लक्षात आला होता. त्याच्या चेहऱ्यावर अंगार फुलून आला आणि मुख्यमंत्र्यांच्या चेहऱ्यावर समजूतदारीचं, विजयाचं हास्य उमलायला लागलं होतं. पण हे क्षणभरच टिकलं. अपोलो खुर्चीवरून उठत जाण्याच्या पवित्र्यात उभा राहिला व अंधाऱ्या गाभाऱ्यातून ऐकू येईल अशा धीरगंभीर स्वरात म्हणाला,

''पाच दिवसांचा काळ का दिला याची मला पूर्ण कल्पना आहे. कारण ह्या कालावधीत संपूर्ण देशातील आम्हा कामगारांतील ती समान कळ व्यवस्थितपणे आम्हाला नकळत जोडण्यासाठी लागणार आहेत, पण लक्षात ठेवा-आमचेही गुप्तहेर काही कमी नाहीत. ते अगदी तुमच्या अंतर्गत गोटातही अधिकारी म्हणून वावरताहेत. तुम्ही जर हे काम करायला सुरुवात केली तर नाईलाजानं आम्हाला शेवटचं हत्यार बाहेर काढावं लागेल. त्यात जर तुमचा नाश झाला नव्हे, होणारच, तर आम्ही जबाबदार राहणार नाही.''

ठामपणे मुख्यमंत्रीही म्हणाले, ''तुम्हाला काय करायचं ते करायला तुम्ही मुक्त आहात, पण आम्ही म्हणजे मानवाच्या बुद्धीमुळं निर्माण झालेल्या तुम्हा गुलामांना कधीही समान हक्कच काय, पण मतदानाचाही हक्क देणार नाही. आता हे प्रकरण पंतप्रधानच हाताळतील. या तुम्ही.''

''मी पुन्हा एकदा सांगतो-नीट विचार करा. ते पाच दिवस मीही तुम्हाला विचार करायला देतो. पण लक्षात ठेवा, तुम्ही जर



आमच्या मुळावर उठलात तर आमच्यातील सर्व तज्ज्ञांना वेगवेगळ्या ठिकाणांहून फॉसिजीन, कार्बनडाय ऑक्साईड, एम. आय. सी. अथवा सल्फरडाय ऑक्साईडसारखे विषारी वायू मोठ्या प्रमाणात वातावरणात भिनवायला, आमची त्यासाठी तयार केलेली स्पेशल यंत्रणा कार्यान्वित करायला लावू. ह्या वायूमुळं काय घडतं हे तुम्हाला काही वर्षांपूर्वी घडलेल्या भोपाळच्या घटनेमुळं कळलंच आहे. तेव्हा लक्षात ठेवा, तुम्ही सगळे जमीनदोस्त व्हाल. तुम्हा मानवांची नावनिशाणीही शिल्लक राहणार नाही. तुम्ही मुंग्या जशा रॉकेलचा बोळा फिरवल्यावर पटापट मरतात तसे तडफडून मराल. पण आम्ही.... आम्ही मात्र जिवंतच राहू. कारण आम्ही अमर आहोत. आम्ही यांत्रव आहोत हे तुम्ही जाणताच.''

एवढं बोलून अपोलो दमदारपणे पावलं टाकीत केबीनच्या बाहेर पडला. मी मात्र बेशुद्ध पडायचाच बाकी उरलो होतो.

टीपा : व्हिजीफोन - टेलिफोन आणि टेलिव्हिजन यांना एकत्रित करून तयार केलेलं उपकरण. त्यात त्याजवळील विशिष्ट कक्षेतून बोलल्यास संपर्क साधलेल्या माणसाला आपला चेहरा दिसतो व बोलणं ऐकू येऊ लागतं. तीच क्रिया पलीकडूनही घडत असते. म्हणजेच दोघंही परस्परांना पाहून संवाद साधत असतात. जसं घरातील एकत्रित बोलणं.

यांत्रव- ह्या शब्दाची उत्पत्ती 'यंत्र मानव' या दोन शब्दांपासून केली आहे. म्हणजेच यांत्रव यंत्र मानव.

❑ ■ ❑ ■ ❑

## अनोख दानं

आंतरराष्ट्रीय वैद्यक परिषदेचं सभागृह हळूहळू गजबजायला सुरुवात झाली होती. एकेक मातब्बर डॉक्टर, शास्त्रज्ञ सभागृहात येऊन आपापल्या जागी आसनस्थ होत होते. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर कुतूहल दिसत होतं. सगळ्या सभागृहाची दृष्टी एका व्यक्तीकडं लागली होती.

''व्यासपीठावर मध्यभागी बसले आहेत तेच ना डॉ. महेश तपासे?''

''पाहा ना, कसा तेजःपुंज चेहरा आहे तो. पण कुठंही अहंमन्यतेचा भाव नाही. नाहीतर आपले शास्त्रज्ञ! जरा कुठं नवीन शोध लावला की लागलीच पळतात हक्क घ्यायला. आणि काय तोरा असतो त्यांचा!''

''डॉ. तपासे मात्र किती शांतचित्त आणि प्रसन्न दिसताहेत. आपण एक मोठा शोध लावलाय, ह्याची घमेंडही नाही. सदा



हसतमुख असतात.''

''खरोखर अजबच नाही का?''

हळू आवाजात अशा प्रकारची डॉ. तपासेंविषयी कुजबूज सभागृहात सर्वच एकमेकांशी करत होते. डॉ. तपासेंनाही जाणवत होतं की साऱ्यांचे डोळे आपल्यावर खिळले आहेत. म्हणून त्यांना आणखीनच अवघडल्यासारखं वाटत होतं. त्यामुळं मुळातीलच त्यांचा विनयशील चेहरा अधिकच खुलून दिसत होता.

अशा प्रकारचं संभाषण चालू असतानाच परिषदेचे यजमान अध्यक्ष डॉ. अल्बर्ट उठून उभे राहिले. आणि ध्वनिप्रक्षेपकासमोर येऊन बोलू लागले.

''सभ्य गृहस्थहो, आज परिषदेच्या पहिल्या दिवशी मी तुमचं मनःपूर्वक स्वागत करतो, ही परिषद दरवर्षी भरणारी असली तरी यावेळी परिषदेला एक वैशिष्ट्य प्राप्त झालं आहे. हे वैशिष्ट्य प्राप्त करून देण्याला कारणीभूत ठरले आहेत, भारताचे थोर डॉ. महेश तपासे. त्यांनी लावलेल्या शोधाचं वर्णन आपण विविध लेखांतून वाचलंच आहे. आज ते त्याच शोधासंबंधी विश्लेषण करणारा निबंधही वाचणार आहेत तेव्हा त्याविषयीच्या शास्त्रीय उकलीसंबंधी मीही तुमच्याएवढाच अधीर झालो आहे.

''खरंतर अशा उच्च कोटीच्या शोधावर शिक्कामोर्तब करण्यासाठी परिषदेची गरज नसावी. पण ह्या जगात अर्ध्या हळकुंडानं पिवळे होऊन श्रेय उपटणारे बरेच आहेत. ते डॉ. तपासेंसारख्या समाजसेवीदृष्टी असलेल्या महात्म्यांकडून माहिती काढून, त्यावरून स्वतःचा एक शोधनिबंध प्रसिद्ध करतात आणि त्या शोधावर आपला शिक्का मारतात. इतिहासात अशा काही विचित्र घटना घडल्यामुळं, वेगवेगळ्या विषय विभागांसाठी आंतरराष्ट्रीय परिषदा आयोजित केल्या जातात. ह्या कार्याची सूत्रं युनोमधील एक समिती हलवीत असते. शेवटी ह्या सगळ्या गोष्टी समाजाला एक निश्चित वळण लावण्यासाठी केल्या जातात. तुम्हाला हे सर्व सांगायची गरज नाही. पण हा एक उपचाराचा भाग म्हणून करणं आवश्यक आहे.

''...तेव्हा आता मी पुन्हा मूळ मुद्याकडं वळतो. डॉ. तपासे हे

भारतातील एका छोट्या शहरात रुग्णालय चालवतात. त्या रुग्णालयाचे जरी ते मुख्य असले, तरी त्यांच्या हाताखालील प्रत्येक कर्मचाऱ्याशी ते मैत्रीनं वागतात. त्यामुळं तेथे घरातील वातावरणासारखं वातावरण आढळतं. कुणीही नोकरीतील पाट्या टाकण्याचं काम करत नाही. अशा या रुग्णालयातूनच त्यांनी महान शोध लावलाय. इथं असलेली प्रयोगशाळा, आपल्याकडील प्रयोगशाळेएवढी अद्ययावत नाही तरीही ते ही कामगिरी बजावू शकले, ह्यातच त्यांच्या यशाचं गमक आहे. त्यांचा विश्वास आहे तो कष्ट, जिद्द आणि सातत्य ह्यावर. कुठल्याही अडथळ्यावर मात करून जाण्याची धमक. मादाम क्युरी आणि अशाच इतर शास्त्रज्ञांचा इतिहास ते जगले आहेत. म्हणूनच त्यांच्या या शोधानं मानवाला एका विलक्षण वळणावर आणून ठेवलं आहे. मी त्यांना विनंती करतो, त्यांनी या शोधाचं इंगित आम्हा पामरांना समजावून देण्यासाठी व्यासपीठाचा ताबा घ्यावा आणि आपला शोधनिबंध वाचावा.''

एवढं बोलून डॉ. अल्बर्ट आपल्या जागेवर बसले. सभागृहात प्रचंड शांतता पसरली होती. साऱ्यांनी आता डॉ. तपासेंच्या बोलण्याकडं कान टवकारले. प्रत्येकजण श्वास रोखून ऐकायला सज्ज झाला. डॉ. तपासे उभे राहिले. आकाशवाणी आणि दूरदर्शनचे अधिकारी तयार झाले. फटाफट फोटो घेतल्याचे आवाज होऊ लागले. क्षणभर व्यासपीठावर प्रकाशाची दीप्ती वाढल्यासारखी वाटली.

–आणि डॉ. तपासेंचा धीरगंभीर आवाज सभागृहात घुमू लागला. आवाजात एवढी ऋजुता होती की, वाऱ्याच्या झुळकीप्रमाणं तो कानाला हवाहवासा वाटत होता. आकाशवाणी तर होत नाही ना, असं क्षणभर ऐकणाऱ्यांना वाटून गेलं. पहिल्या काही क्षणांतच डॉक्टरांनी सारं सभागृह आपल्या ताब्यात घेतलं. त्यांचं प्रत्येक वाक्य श्रोत्यांना गुंगवून टाकत होतं. इतकं की, त्यांना आश्चर्याचे उद्गार काढायलाही अवसर मिळत नव्हता. प्रत्येकजण मंत्रमुग्धपणे खुर्चीला खिळून बसला होता. तब्बल दोन ते अडीच तास डॉक्टर बोलत होते. बोलता बोलता काही गोष्टी ओव्हरहेड प्रोजेक्टरच्या



सहाय्याने समजावूनही देत होते.

शोधनिबंधाचं वाचन संपलं आणि डॉक्टर खाली बसले. त्यानंतरही क्षण दोन क्षण सभागृहात शांतताच होती. अचानक श्रोते भानावर आले. उत्स्फूर्तपणे टाळ्यांचा कडकडाट सुरू झाला, तो तब्बल पाच मिनिटे चालूच होता. डॉक्टरांनी सभा जिंकली होती, हे वेगळं सांगायला नकोच.

सभा संपल्यानंतर प्रत्येकजण डॉक्टरांशी हस्तांदोलन करत होता. ते करताना आपला आदर व्यक्त करत होता. त्यांच्याशी 'भारतीय' म्हणून हिणवणारेही आता अदबीनं वागत होते.

परिषदेतील मुकुटमण्याचा सन्मान मिळवून डॉक्टर आता मायदेशी परतायला निघाले होते. त्यांच्या चेहऱ्यावर समाधानाची तृप्ती जरी दिसत असली तरी खरं तर त्यांच्यावर पडलेल्या ताणामुळं त्यांना विश्रांतीची गरज भासत होती. पण विश्रांती विमानात बसेपर्यंत तरी मिळणार नव्हती. शेवटी सर्व सोपस्कार घेऊन ते एकदाचे विमानात बसले. अन् डोळे मिटून पडून राहिले.

झटक्यात गेल्या तीन दिवसांचा चलत्‌चित्रपट त्यांच्या डोळ्यांसमोरून सरकून गेला. त्याच वेळी ह्या सन्मानाला कारणीभूत असलेल्या गेल्या सहा वर्षांचा कालखंडही त्यांच्या डोळ्यापुढं उलगडू लागला.

सहा वर्षांपूर्वीची ती संध्याकाळची घटना, आजही त्यांना अगदी कालच घडल्यासारखी स्वच्छ दिसत होती. ते घरी जायला निघाले होते, तेवढ्यात एक व्यक्ती घाबऱ्याघुबऱ्या अवस्थेत त्यांच्यासमोर येऊन उभी राहिली. तिला धाप लागली होती पण तरीही ती घाईघाईनं बोलण्याचा प्रयत्न करत होती.

''डॉ... डॉक्टर घरी... नाही नाही. मी त्यांना इथं आणलंय. तुम्ही ताबडतोब त्यांच्यावर काहीतरी उपचार करा.''

डॉक्टरांनी प्रथम तिला शांत केलं आणि विचारलं, ''काय झालंय पेशंटला; ते तर कळू द्या आधी.''

''कारखान्यात काम करताना त्यांच्या उजव्या हाताची पाचही बोटं तुटली आहेत. मालकानं जुजबी मलमपट्टी करून घरी पाठवून दिलं. पण त्यांना आता कळा सहन होत नाहीत. कारखाना अगदी

लहान असल्यामुळं मालक काही करायला तयार नाही. कामगारही काही करू शकत नाहीत. तुमचं नाव कुणाकडून तरी ह्या गडबडीत ऐकलं आणि त्यांना घेऊन धावत आले तुमच्याकडे. डॉक्टर प्लीज, नाही म्हणू नका. त्यांना वाचवा हो.'' असं म्हणत ती डॉक्टरांच्या पायावर पडली.

'अरे, अरे, असं काय करताय, प्रथम उठा बघू, बोलवा त्यांना आत. पाहू काय करता येतं ते.''

डॉक्टरांनी पेशंटला आत घेतलं. त्याची तपासणी सुरू केली. जखम बरीच खोल होती. बोटांची हाडं संपूर्णपणे चेचली गेली होती. ती जखम बरी करण्यासाठी बोटं कापणं भाग होतं. ताबडतोबीनं शस्त्रक्रिया करणं आवश्यक होतं.

डॉक्टरांनी झटपट निर्णय घेतला अन् म्हणाले, ''ही जखम बरी व्हायची असेल तर त्यांची बोटं कापणं आवश्यक आहे. हा निर्णय कडवट असला तरी पेशंटच्या भवितव्याच्या दृष्टीनं हितावहच ठरणार आहे.''

''पण डॉक्टर, ह्यांच्या हातावरच तर आमचं जीवन अवलंबून आहे; तेच कापलं गेलं तर ...''

''हल्ली आपण कृत्रिम बोटंही बसवू शकतो. त्यामुळं नंतर काळजी करण्यासारखं काही राहणार नाही आणि हे पाहा, आलेल्या परिस्थितीला सामोरं तर गेलंच पाहिजे, नाही का? मग असं हातपाय गाळून कसं चालेल बरं?''

डॉक्टर त्यांना समजावत, चुचकारत ऑपरेशन थिएटरमध्ये घेऊन गेले. दरम्यानच्या काळात सगळी तयारी त्यांच्या सहाय्यकानं करून ठेवलीच होती. त्यांच्या लेखी ही शस्त्रक्रिया म्हणजे लहानसहान बाबच होती.

शस्त्रक्रियेत पेशंट रमेशची पाचही बोटं कापण्यात आली. आणि त्यावर बँडेज बांधण्यात आलं. दहा ते बारा दिवस दररोज पट्टी बदलण्यात येत होती. जखमही भरू लागली होती. एवढ्या झटपट जखम भरत असल्याचं पाहून डॉक्टरही खूश होते. रमेशची शरीरांतर्गत प्रतिकारशक्ती चांगलीच दिसत होती. दहा दिवसांनंतर त्याला पक्क बँडेज बांधून महिन्याभरानं त्याचा हात



मोकळा करण्यासाठी बोलावलं आणि डॉक्टर आपल्या नेहमीच्या कामाकडं वळले. इथंपर्यंत सारं कसं आखीव-रेखीवपणे चाललं होतं. कुठंही धक्का देणारी घटना घडली नव्हती.

महिन्याभरानंतर रमेश डॉक्टरांकडं आला. डॉक्टरांनी प्राथमिक विचारपूस केल्यानंतर त्याचा हात मोकळा करायला सुरुवात केली. बँडेजचा एकेक पदर उलगडू लागले. जखम पूर्णपणे बरी झाल्यासारखी वाटत होती. पट्टी पूर्ण सुटली अन् डॉक्टर बोटांची तपासणी करू लागले.

''अरे, हे काहीतरी अघटित घडलंय. असं होणं शक्यच नाही.'' डॉक्टर स्वतःशीच एवढ्या जोरानं पुटपुटले की रमेश बावचळलाच.

''काय झालं डॉक्टर, तुम्ही असे आश्चर्याने काय बघताय माझ्याकडे?''

डॉक्टर भानावर आले. त्यांनी रमेशला थोडा वेळ बाहेर बसायला सांगितलं. त्यांना स्थिर होण्यासाठी काही काळ एकांत आवश्यक होता. रमेशला कळेना की असं काय घडलं, ज्यामुळं डॉक्टर एवढे अस्वस्थ झाले आहेत? जखम तर बरी झाली आहे. अख्खी बोटं न जाता, डॉक्टरांच्या कौशल्यानं अर्धा-पाऊण भागच कापला गेला आहे. असा विचार तो करीत असतानाच डॉक्टरांचं पुन्हा बोलावणं आलं.

''रमेश, मला पुन्हा काही चाचण्या घ्याव्या लागणार आहेत. त्यासाठी तुला काही दिवस माझ्या रुग्णालयात राहावं लागेल, कदाचित काही महिनेही.''

''पण डॉक्टर, माझी जखम तर बरी झाली आहे. मी व्यवस्थित सगळे व्यवहार करू शकतोय. महत्त्वाचं म्हणजे एवढे दिवस रजा कशी मिळेल? माझी नोकरीच जायची एखादवेळेस. मग माझ्या संसाराची काय वाट?'' रमेशने भराभर एकापाठोपाठ आपल्या समस्यांची मांडणी केली.

''बरं मग असं कर, आठवड्यातून एकदा तुझ्या सुटीच्या दिवशी मी सांगेपर्यंत सतत येत जा. पण आता ताबडतोबीनं काही चाचण्या करणं आवश्यक आहे, तेवढ्या मात्र ह्याच आठवड्यात

करून घेऊ.

रमेश निघून गेल्यावरही डॉक्टर त्याच्या बोटावरच विचार करत होते. त्यांना चांगलं आठवत होतं की, शस्त्रक्रिया करताना त्यांनी प्रत्येक बोट पंजाच्या मुळापासून कापलं होतं. परिस्थितीच अशी होती की प्रत्येक बोटाच्या हाडांचा भुगाच झाला होता. आणि आता त्यांना प्रत्येक बोट एकेक पेरापर्यंत वाढलेलं दिसत होतं. हे काय गौडबंगाल आहे, हे त्यांना कळेना. कापलेल्या बोटांची, पालीच्या तुटलेल्या शेपटीप्रमाणं वाढ होऊ शकते यावर त्यांचा विश्वास बसणं शक्यच नव्हतं, पण प्रत्यक्षात फरक मात्र दिसत होता. त्यांना पुनःपुन्हा चांगलं आठवत होतं की, बोटं शस्त्रक्रियेच्या वेळी पूर्णपणे कापली होती. म्हणूनच ते चक्रावले होते आणि गंभीरही झाले होते.

डॉक्टरांनी रमेशच्या पुन्हा आवश्यक त्या चाचण्या घ्यायला सुरुवात केली. पुन्हा एक त्यांना आश्चर्याचा धक्का बसला. एका चाचणीत रमेशला कर्करोग झाल्याचं निदान झालं होतं. ते हबकलेच. कर्करोगात माणूस क्षणाक्षणानं मृत्यूच्या जवळ जात असतो. शरीरानं खंगत असतो. पण रमेशची जखम चांगलीच भरली होती. एवढंच नव्हे तर बोटांची लांबीही वाढली होती. त्यांना राहून राहून आश्चर्य वाटत होतं की, एवढी प्रतिकारशक्ती प्रखर असताना त्याला कर्करोग झालाच कसा. रमेशला ह्याची कल्पना द्यावी की न द्यावी या बुचकळ्यात ते पडले होते. विचार करकरून त्यांचा मेंदूचा भुगा व्हायची वेळ आली होती. त्यांनी रमेशला आता सतत निरीक्षणाखाली ठेवायचं ठरवलं.

ते तसेच उठले आणि आपल्या स्टडीत गेले. त्यांची स्टडी म्हणजे अनेक नामवंतांच्या संशोधन निबंधांचा आणि प्रबंधांचा खजिनाच होता. ते धडाधड सारे संदर्भ शोधू लागले. पण त्यांना अशा विचित्र केसचा संदर्भ काही सापडू शकला नाही. हळूहळू रुग्णालय आपल्या सहाय्यकांवर सोपवून ते आपला सारा वेळ स्टडीतच घालवू लागले. ह्या धावपळीत ते रमेशला मात्र न चुकता दर आठवड्याला भेटत होते. त्याच्या बोटांचं निरीक्षण व त्याच्या चाचण्या चालल्याच होत्या. रमेश तर निरोगी वाटत होता. पण



प्रत्येक वेळच्या चाचणीत कर्करोगाचं निदान पक्कं होत होतं. गुंता वाढू लागला होता.

होता होता वर्ष उलटलं, पण गुंता काही सुटला नाही, उलट आणखीनच वाढला. रमेशच्या बोटांची लांबी ह्या अवधीत आणखी काही मि. मी.ने वाढली होती. रमेशलाही आता संशय येऊ लागला होता.

"डॉक्टर बोटांची शस्त्रक्रिया झाली तेव्हा त्यांचं एकेक पेरच शिल्लक होतं ना? मग हे पेरांवर आणखी मांस कसलं वाढलंय? बोटं चक्क अर्धी वाढल्यासारखी वाटताहेत?" एका भेटीत रमेशने अभावितपणे प्रश्न विचारला होता.

डॉक्टरांनी त्या वेळेला काहीतरी जुजबी उत्तर देऊन त्याची शंका फेडण्याचा प्रयत्न केला. गेल्या वर्षभरात त्यांनी कर्करोगासंबंधीची अद्ययावत ती सारी माहिती वाचून काढली होती, पण उत्तर मात्र सापडत नव्हतं.

ते हल्ली कर्करोगासंबंधी निराळ्याच दिशेनं विचार करू लागले होते. सुरुवातीला त्यांनी तो विचार झटकून टाकायचा प्रयत्न केला. पण त्यांचं दुसरं मन म्हणत होतं की, 'शास्त्रज्ञानं ....विज्ञानाच्या वाटाड्यानं कधीही डोळ्यावर झापडं लावून काम करू नये. आलेल्या नवीन विचाराच्या दिशेनं निरीक्षण व प्रयोग करायला कचरू नये. काय सांगावं, कदाचित यातूनच एखाद्या नव्या शोधाचा उगम होणार असेल. तेव्हा पाठपुरावा कर. जास्तीत जास्त काय होईल, तर चुकीचे निष्कर्ष निघतील, पण विचारांचा पाठपुरावा केल्याचं समाधान तर मिळेल; नाहीतर उगीचच संधी गमावल्याचं शल्य बोचत राहील.

मनाच्या ह्या उभारीमुळं त्यांनी नव्या विचारांची पुन्हा तर्कशुद्ध मांडणी करण्यास सुरुवात केली.

कर्करोग म्हणजे तरी काय? तर शरीरातील पांढऱ्या पेशींची अचानकपणे भराभर वाढ होणं. त्यांची पूर्ण वाढ न झाल्यामुळं वाढलेल्या पांढऱ्या पेशी शरीरातील रक्तप्रवाहात अडकून बसतात . त्यांच्या गाठी तयार होतात व त्या मरतात. प्रत्येकाच्या शरीरात पांढऱ्या पेशी असल्यामुळं हा रोग कुणालाही होऊ शकतो.

डार्विनच्या सिद्धांताप्रमाणं जगात सतत कित्येक हजारो... लाखो वर्षं उत्क्रांती चालू आहे. ह्या उत्क्रांतीतूनच एकपेशीय जीवांपासून वाढ होत होत आजचा मानव तयार झाला आहे. त्याचबरोबर ह्या उत्क्रांतीच्या टप्प्यांमध्ये जी जमात निसर्गाशी जुळवून घेते, तीच टिकत आली आहे आणि ज्यांना निसर्गातील परिस्थितीशी जुळवून घेता आलं नाही ते नामशेष झाले आहेत. ज्या अवयवांची जुळवून घेण्यासाठी आवश्यकता असते, त्यांची वाढ व उत्क्रांती होत जाते. पण ज्या अवयवांचा उपयोग कमी होत जातो, ते कलांतरानं नाहीसे होतात.

म्हणूनच तर शेपटीचा उपयोग करणं बंद झाल्यावर माकडापासून आदीमानव उत्क्रांत झाला. आता उरलंय ते फक्त माकडहाड. नखं आणि केसांची वाढही हल्ली मर्यादित झाली आहे. कान हलवण्याची क्रिया आता इतिहासजमा झाली आहे. सरड्यांना रंग बदलण्याची किमया करता येते. प्रत्येक प्राण्याला निसर्गाशी जुळवून घेण्याचं वैशिष्ट्य प्राप्त झालं आहे. तसंच डायनासोरससारख्या काही जमातींना निसर्गाशी जुळवून न घेता आल्यामुळं त्या नामशेष झाल्या आहेत.

उत्क्रांती आजही थांबलेली नाही. माणसाचा मेंदू सतत उत्क्रांत होत आहे. म्हणून आज आपण विश्वाला गवसणी घालण्याचा विचार करू शकतो. ह्या उत्क्रांतीत शरीरांतर्गत बदलही घडत असावेत. काय सांगावं. नव्हे, हा बदल होण्याची क्रिया सतत चालूच आहे. फक्त हे बदल लाखो वर्षांनी निदर्शनास येणारे असतात. म्हणून कळत नाहीत एवढंच.

ह्या उत्क्रांतीच्या टप्प्यावर निसर्ग पांढऱ्या पेशींची वाढ करून शरीरातील अवयवांवर चाचपणी तर करत नसेल की एखादा अवयव निकामी झाला, पण तो उपयुक्त आहे, तर त्यांची पुन्हा वाढ होणं आवश्यक आहे. त्यासाठी तर ही चाचपणी चालली नसेल? ठिकाण चुकले की त्या पेशी मरतात व गाठी तयार होतात. मग आपण म्हणतो की या व्यक्तीला कर्करोग झाला!

रमेशच्या बाबतीत मात्र योग्य ठिकाण सापडलं आणि तिथं पेशींची वाढ होऊन त्याच्या बोटांची लांबी वाढायला लागली.



म्हणूनच कदाचित कर्करोगाचं रूढार्थानं निदान होऊनही, त्या पेशी योग्य ठिकाणी कार्यरत राहिल्यामुळं, रमेश निरोगीच राहिला नसेल कशावरून?

निसर्गाच्या ह्या घडामोडीमुळंच आजपर्यंत कर्करोग हा असाध्य रोग राहिला आहे. तेव्हा या पेशींची प्रयोगशाळेत कृत्रिमरीत्या वाढ करून ह्याचे प्रयोग प्राण्यांवर करून पाहिले पाहिजेत.

ह्या विचाराने डॉक्टर उत्तेजित झाले आणि नव्या उमेदीने कामाला लागले. अथक परिश्रम करून पाच वर्षांत त्यांनी कृत्रिम पेशींची वाढ करून त्या प्राण्यांना टोचल्या. त्यांच्या तुटलेल्या अवयवांची वाढ करण्यात त्यांना यश आलं. दरम्यानच्या काळात रमेशच्या बोटांची लांबीही चांगलीच वाढली होती. डॉक्टरांनी त्याला सर्व गोष्टींची कल्पना दिली होती. त्यामुळं त्याला आश्चर्य न वाटता, आपण ह्या शतकाचे उत्क्रांती टप्प्यातील महत्त्वाचे 'प्राणी' ठरल्याबद्दल रास्त अभिमान वाटू लागला होता. डॉक्टरांबरोबर त्याचंही नाव अजरामर होणार होतं. ह्याच विषयावरचा शोधनिबंध वाचून त्यांना आज जागतिक सन्मान प्राप्त झाला होता.

''डॉक्टर, उतरताय ना? सहार विमानतळ आलंय.'' हवाई सुंदरींच्या मधाळ बोलण्याने ते तंद्रीतून जागे झाले. आणि आजूबाजूला पाहू लागले.

❑ ■ ❑ ■ ❑

# अघटित

"अहो, मी खरंच वेडा नाहीय. मी सांगतो ते अगदी सत्य आहे. त्या टेलीनं... टेली म्हणजे त्या परग्रहस्थ मुलीनंच मला शिकवलंय हे सारं. त्यामुळंच तर मी तुमचा कुठलाही रोग बरा करू शकतो. तेही काही मिनिटांत. हवं तर अजमावून पाहा. कुणाचं हाड मोडलं असेल, हाडातील रस कमी झाला असेल, यकृताला सूज आली असेल, अल्सर झाला असेल आणि काय वाट्टेल ते झालं असलं तरी माझा त्यावरून हात फिरला की तो रोगी खाड्कन बरा होईल. खरंच विश्र्वास ठेवा माझ्यावर. असं एखाद्या वेड्या माणसाला पाहिल्यावर कुत्सितपणे हसतात, तसं हसू नका." प्रो. मानवेंद्र त्यांच्या शास्त्रज्ञ मित्र-मंडळींना जीव तोडून सांगण्याचा... समजावण्याचा प्रयत्न करीत होते.

पण ते सगळे याला खूळ लागलंय अशा नजरेनं त्याच्याकडं पाहात होते. ती नजरच प्रो. मानवेंद्रना खात होती. असं कधी



घडलंय की हात लावला नि रोग बरा! छट्, काहीतरी वेड्यासारखं बरळतोय झालं. ते अशा चमत्कारावर विश्र्वास ठेवणार थोडेच. आम्हाला हवाय पुरावा... सर्वार्थ प्रयोगानं सिद्ध होणारा. हा म्हणतोय परग्रहस्थ मुलीनं शिकवलीय ही विद्या. ही आणखी एक थाप. निदान असल्या थापा त्यानं आमच्यासारख्या शास्त्रज्ञांसमोर तरी मारू नयेत.

डॉ. यशपालना त्याची फिरकी घेण्याची लहर आली. ते म्हणाले "हे बघ, आज सकाळपासून माझी दाढ दुखतेय. थोडीशी सुजली पण आहे. तू तुझा हात लावून बरी करतोस?" प्रो. मानवेंद्र पुढं सरकले. त्यांना वाटलं ही संधी गमावता कामा नये. यशपालची दाढदुखी थांबवली तर निदान माझ्या विद्येवर त्यांचा विश्र्वास तरी बसेल. म्हणून त्यांनी डॉ. यशपालच्या दाढीला हात लावला. एकाग्र चित्त करून ते हळूवारपणे त्यांच्या दाढीवरून हात फिरवू लागले. बाकी सगळे मात्र ह्या देखाव्याने गालातल्या गालात हसत होते. प्रो. मानवेंद्रांनी हात काढला आणि विचारलं, "आता कसं वाटतयं?"

आता आश्र्चर्यचकित होण्याची पाळी डॉ. यशपालांची होती. त्यांच्या चेहऱ्यावरचं हास्य मावळून ते काहीसे गंभीर बनले. इतर मंडळीही त्यांच्या चेहऱ्यावरचे बदलते भाव निरखीत होती. जाहिरातीत विक्सची गोळी घेतल्यावर जशी पट्कन घशाची खवखव थांबते; तद्वतच डॉ. यशपालांची दाढदुखी थांबली होती. त्यांना शेवटी ही गोष्ट जाहीरपणे कबूल करावीच लागली. मग मात्र सगळ्या शास्त्रज्ञांनी गंभीरपणे प्रो. मानवेंद्रकडं पाहायला सुरुवात केली. प्रो. मानवेंद्रना वाटलं जिंकली... आपण जिंकली. ते हसत बोलू लागले, "पाहा, मी सांगितलं नव्हतं, त्या टेलीनं मला ही विद्या शिकवलीय म्हणून. अहो, परवा समुद्रकिनाऱ्यावरून जाणाऱ्या हायवेवर तिची माझी अचानक गाठ पडली. माझी मोटरसायकल अचानकपणे स्लीप झाली. माझ्या पायाचं हाड मोडलं. ते तिनं झटकन् बसवून दिलं..." प्रो. असेच बोलत राहिले असते. पण सर्वांच्या डोळ्यातील अनामिक भाव पाहून ते स्तब्ध झाले.

डॉ. दास एकाएकी म्हणाले, "तुमच्यावर आम्हाला संशोधन केलं पाहिजे. आणखी काही प्रयोग करून तपासलं पाहिजे. जे आपल्या अत्याधुनिक विज्ञानालाही जमलं नाही ते तुमच्या त्या

तथाकथित परग्रहस्थ टेलीनं तुम्हाला दिलंय. हे काही तरी अघटित आहे.

डॉ. दासच्या डोळ्यांतून अजूनही अविश्र्वास ओसंडत होता. तरी प्रो. मानवेंद्रनी त्यांना सहकार्य करायचं आश्र्वासन दिलं. पुढं दोन दिवस प्रो. मानवेंद्र डॉ. दास व डॉ. यशपाल यांच्या बरोबर रुग्णालयातून फेऱ्या मारत होते व त्यांनी सांगितलेल्या रोग्यांना हात लावून त्याचे रोग बरे करीत होते. प्रत्येक वेळी डॉक्टरद्वय हतबुद्ध होत होते. ह्या दोन दिवसांत प्रो. मानवेंद्रांनी कुणाचा अल्सर, कुणाचं हृदय, तर कुणाची हाडं व्यवस्थित करून दिली होती. हे सर्व स्वतःच्या डोळ्यांनी पाहात असतानाही डॉ. दासना अजून विश्र्वास वाटत नव्हता. ह्या अघटितामागची कारणं काय? याचा विचार त्यांना स्वस्थ बसू देत नव्हता. प्रो. मानवेंद्रवरच्या संशोधनाची दिशा काय ठेवावी हेही त्यांना कळत नव्हतं.

त्यांच्या ह्या प्रयोग चाचण्यामुळं मात्र हा हा म्हणता प्रो. मानवेंद्रच्या 'दैवी शक्ती'ची बातमी रुग्णालयात आणि बाहेरही पसरली होती. त्यामुळं प्रो. मानवेंद्रकडं अनेक रोग्यांची रीघ लागू लागली. त्यांना क्षणाचीही उसंत मिळेनाशी झाली. आणि डॉ. दासना त्यांच्यावर संशोधन करण्यासाठी, प्रो. मानवेंद्रना एकटं काढून काही वेळ देणंही जड जाऊ लागलं.

डॉ. दासनी प्रो. मानवेंद्रना वेगळं काढण्यासाठी शासकीय उच्च पातळीवरुन सूत्रं हलवली आणि एक दिवस सर्व वर्तमानपत्रांतून बातमी जाहीर झाली. 'प्रो. मानवेंद्राचे परग्रहस्थ टेलीसह पलायन.' बातमीही चविष्टपणे देण्यात आली होती. इकडं प्रो. मानवेंद्र मात्र एका अज्ञात स्थळी नजरकैदेत पडले होते. डॉ. दास व यशपाल त्यांच्याकडून टेलीविषयी माहिती काढण्याचा प्रयत्न करत होते. पण प्रो. मानवेंद्र त्या भेटीव्यतिरिक्त त्यांना कसलीच माहिती देऊ शकत नव्हते. कारण खुद्द त्यांनाही यापलीकडचं माहीत नव्हतं. ती आली कुठून अन् गेली कुठं? ह्या प्रश्र्नाचं उत्तरही ते देऊ शकत नव्हते.

प्रो. मानवेंद्रना आता ह्या नजरकैदेचा कंटाळा येऊ लागला होता. डॉ. दास व यशपाल त्यांचा पिच्छा सोडायला तयार नव्हते.



त्याच त्या चर्वितचर्वण झालेल्या घटनेची चर्चा करण्यात प्रो. मानवेंद्रना वैताग आला होता.

एक दिवस ते ग्लानीनं अवेळीच झोपी गेले. 'टेली... टेली अगं तू कुठं आहेस. मला परत भेटणार होतीस नं? अगं या नजरकैदेत मी खितपत पडलोय ग.' असं झोपेत बडबडत असतानाच त्यांना जाग आली. टेलीच्या प्रथम भेटीच्या संध्याकाळचा देखावा त्यांच्या नजरेपुढून सरकू लागला...

प्रो. मानवेंद्र समुद्राला समांतर असणाऱ्या हायवेवरून आपल्या मित्राकडं त्याच्या मुलीच्या वाढदिवसाच्या पार्टीला जात होते. मस्त संध्याकाळ पसरली होती. एका बाजूला समुद्रात बुडणारं लालचुटूक सूर्यबिंब, तर टेकड्यांच्या वृक्षराजीतून घरट्यात परतलेल्या पक्ष्यांचा किलबिलाट चालू होता. धुंद निसर्ग न्याहाळत सावकाशपणे मोटरसायकलवरून जात होते. आजच्या निसर्गसौंदर्यावर ते निहायत खूश होते. कदाचित त्यांचं मन प्रसन्न असल्यामुळंही त्यांना आजचा निसर्ग जास्त भावला असावा. या धुंदीतून जात असतानाच त्यांची मोटरसायकल घसरली. ते धडपडले आणि गाडीखाली दबलें गेले. ह्या धडपडीत त्यांना त्यांच्या उजव्या पायाचं हाड कडकन आवाजामुळं मोडल्याचं जाणवलं. पायातून एक प्रचंड कळ निघून गेली. रस्ता संपूर्ण निर्जन होता. क्षणभर त्यांना ग्लानी आली.

''काही जास्त लागलं तर नाही ना?'' एक मंजूळ आवाज त्यांच्या कानाशी किणकिणला.

ते निपचित पडलेले असताना खरंतर ह्या प्रश्र्नाला काही अर्थ नव्हता. मोठ्या कष्टानं डोळे उघडून पाहिल्यावर त्यांना असं दिसलं की, एक मुलगी त्यांना शुद्धीवर आणायचा प्रयत्न करतेय. ते तिला म्हणाले, ''बघ, कुणी माणसं दिसताहेत का? म्हणजे ही गाडी तरी ते माझ्या अंगावरून काढतील अन् मी जरा मोकळा होईन.'' ''इथं माझ्याशिवाय कुणीही नाहीय. मी एकटीच आहे.'' ''अरेरे!'' अचानक मानवेंद्रच्या तोंडून उद्गार सटकले. त्यांना जाणीव झाली की, मुलीशिवाय खरोखरच आपल्या मदतीला कुणी येऊ शकणार नाही. रस्ता संपूर्ण निर्मनुष्य होता. ''तू ही मोटरसायकल एकटी

उचलशील? निदान थोडी वरच्या बाजूला उचलली तरी मी माझे पाय त्याखालनं काढू शकेन.'' मोठ्या कष्टानं प्रो. मानवेंद्र म्हणाले.

तिनं एकदा मानवेंद्रकडं अन् नंतर गाडीकडं पाहिलं. मग कसला तरी निश्चय करून, एक शब्दही न बोलता तिच्या जीनच्या खिशात हात घातला. खिशातून तिनं एक चकतीसारखी दिसणारी गोल वस्तू काढली. आडव्या पडलेल्या मोटरसायकलच्या खालच्या जमिनीशी टेकलेल्या बाजूला ती वस्तू चिकटवली. काय होतंय हे कळण्याच्या आत त्यांची मोटरसायकल जमिनीवरून उडाली आणि खड्ड्याच्या बाजूला जाऊन पडली. त्या मुलीनं तिला तशीच धरून स्टँडवर लावायचा प्रयत्न केला. पण ती मोटरसायकल जमिनीवरून घसरत खड्ड्यात पडली. तिनंही मग तिला उभी करायचे कष्ट घेतले नाहीत. ते क्षणार्धात मोकळे झाले होते. त्यांना मात्र हे दृश्य पाहून सुपरमॅनची आठवण झाली. त्यांचे डोळे इतके विस्फारले गेले की, त्यांना वाटलं आता बेशुद्धच पडणार. डोकं शांत करण्यासाठी त्यांनी मनातल्या मनात एक ते दहा अंक मोजले.

प्रो. मानवेंद्र त्या भुऱ्या केसाच्या गोड छोकरीकडं पाहून म्हणाले, ''तुझं नाव काय हे कळेल मला?''

''टेली म्हणतात मला.''

''टेली, मला वाटतंय माझं पोटरीजवळचं हाड मोडलंय. तू जरा आजूबाजूला फिरून काही चपट्या काड्या गोळा कर. म्हणजे मला बँडेज तरी बांधता येईल. आई ग.'' बोलता बोलता पाय जरासा हलल्यामुळं कळ आली होती.

टेली हळूच खाली बसली. तिनं अंगावरील जॅकेट काढून त्याची घडी केली. अन् त्यांच्या डोक्याखाली उशीसारखी सरकवली. त्यावर डोकं ठेवल्यामुळं जरा आराम मिळाला. ती म्हणाली, ''तुम्हाला असं बँडेज बांधायची गरज नाहीय. शांतपणे झोपून राहा आणि जरा वेगानं श्वासोच्छ्वास करा. थोडं दुखेल. पण खडखडीत बरे व्हाल.''

तिनं त्यांची पँट हळूहळू पोटरीपर्यंत दुमडली. ती पोटरीकडं ज्या काळजीयुक्त नजरेनं पाहात होती; ते पाहून त्यांना कळून चुकलं की अस्थिभंग मोठा असावा. हे खरंय की, रक्त आलं



नव्हतं. पण सूज मात्र होती. तिची बोटं सावकाशपणे त्यांच्या पोटरीवरून फिरत होती. हे फिरवणं एवढं हळूवार होतं की, जणू एखादं मोरपिसच कुणीतरी फिरवतंय. तिनं मोडलेली हाडं पकडली अन् झडकन ताणून त्यांची सांधेजोड करून टाकली. तेवढी क्षणभर कळ आली. तरीही तिनं सांगितल्यावर श्वासोच्छ्वास ते घेत होते. ताबडतोब दुखणं थांबलं होतं. एवढंच काय, डोळ्यावरची ग्लानीही नाहीशी झाली होती. थोडंसं उत्साही वाटायला लागलं होतं. समाधानानं त्यांना क्षणभर डुलकी आली असावी.

त्यांनी डोळे उघडून पाहिलं तेव्हा त्यांना असं दिसलं की, टेली त्यांच्या शेजारीच गवतावर बसलीय आणि ते मात्र तिच्या जॅकेटची उशी घेऊन खडकावर झोपले आहेत. त्यांनी डोळे उघडलेले पाहून टेली म्हणाली, ''आता किती वेळ असं आजाऱ्याचं सोंग घेऊन पडून राहणार. उठा आता, संध्याकाळ टळायला लागलीय.''

'कोण आजारीपणाचं ढोंग करतंय? मी? तू पाहिलंस ना किती मोठा अस्थिभंग झालाय तो?'' तिचं झोंबरं बोलणं पार धुडकावून लावत प्रो. मानवेंद्र म्हणाले.

''कोण म्हणतंय तुमचा पाय मोडलाय म्हणून? उगीच काही तरी बाता मारू नका. 'क्ष' किरणांनी परीक्षा घेतलीत तरी तुम्हाला मी काय म्हणतेय त्याची प्रचीती येईल. तुम्ही पूर्णपणे एकसंध आहात. काही हाडबिड तुटलेलं नाहीय.'' टेली.

प्रो. मानवेंद्रनी एक खोल उसासा घेतला आणि घाबरत घाबरत उभे राहिले. पाहातात तो काय, ते व्यवस्थित दोन पायांवर उभे राहिले होते. हाड मोडल्याची कुठलीही खूण दिसत नव्हती. त्यांच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. ही कोण देवदूत मुलगी आहे की काय, असं त्यांना वाटायला लागलं. मघाशी मोटरसायकल उचलण्याची ती तऱ्हा, तर मोडलेलं हाड दुरूस्त करण्याची ही तऱ्हा. त्यांना वाटलं आपण स्वप्नात तर नाही ना? की ह्या मुलीला काही विशेष विद्या अवगत आहे? की ही परग्रहस्थ आहे?

शेवटचा प्रश्न त्यांनी ताबडतोब निकालात काढला. हा विचार कदाचित त्यांच्या विज्ञान नवलकथा वाचण्याच्या नादातून सुचला

असावा.

त्यांचा चेहरा थोडासा बावळट झाला असावा, असं त्यांना वाटलं. कारण टेली म्हणत होती, ''काही काळजी करू नका. होतं असं बऱ्याच वेळेला.''

ती सहानुभूतीपूर्ण नजरेनं त्यांना धीर देण्याचा प्रयत्न करीत होती. मानवेंद्र मात्र आता तिच्याविषयी विचार करायला लागले होते. कोण असेल बरं ही? असा विचार करता करता ते समुद्राच्या दिशेनं चालायला लागले होते. त्यांना तोंड आणि हात धुवावेसे वाटत होते. तिच्याविषयीचं कुतूहल वाढत होतं. पण प्रश्न कसा विचारावा हे निश्चित होत नव्हतं.

त्यांनी मग सरळच प्रश्न केला, ''तू राहतेस कुठं? आणि एवढ्या संध्याकाळी एकटीच कशी?''

''मी परग्रहस्थ आहे. बऱ्याच वर्षांपासून पृथ्वीला भेट देण्याचा आमचा प्रयत्न चालू होता. आमच्या विज्ञानानं शेवटी बाजी मारली.'' ती शांतपणे म्हणाली.

प्रो. मानवेंद्र क्षणभर चपापले. विजेचा धक्का बसल्याप्रमाणे त्यांनी खांदे उडवले अन् म्हणाले, ''काय? खरंच तू... तू परग्रहस्थ आहेस?'' क्षणभराने ते पुन्हा म्हणाले, ''तू आता दिसतेस तशीच खरीखुरी आहेस की यांत्रव आहेस?'' ''नाही मी आता दिसतेय तशीच आहे.''

हे काय घडत होतं? दोन वेगवेगळ्या जीवसृष्टीचे प्रतिनिधी एकमेकांना भेटत होते. प्रो. मानवेंद्रना काय करावं हेच सुचेनासं झालं.

''मी काय करू? मी काय करू?'' असं ते स्वतःशीच पुटपुटत होते.

''काही करू नका. शांतपणे बसा. अशा अनेक गोष्टी आहेत की ज्या मलाही करता येत नाहीत.'' ती कमालीच्या शांतपणे बोलत होती. नंतर ती डोळे बारीक करून माझ्याकडं रोखून पाहू लागली. अगदी हळुवार आवाजात म्हणाली, ''मी तुम्हाला काही शिकवू का?''

''मला? चिमुरड्या पोरी, तू मला शिकवणार?'' हसतच प्रो. मानवेंद्र म्हणाले.

''मी तुम्हाला भेटल्याचा पुरावा मागे ठेवून गेलंच पाहिजे.



तुम्हाला काहीं न सांगता जाणं हा माझा अपराध ठरेल. तुम्हाला कोणताही रोग बरा करण्याची विद्या, तुमच्या मेंदूच्या विशिष्ट केंद्रात मी भरवते. मग तुम्ही ज्याला हात लावाल त्याचा रोग बरा होईल. किती तरी हजारो, लाखो, करोडो, लोकांचे रोग बरे करू शकाल तुम्ही.''

''ते खरंय. पण मग तू आमच्या शास्त्रज्ञांच्या सभेतच हे सर्वांसमोर उघड कर की. हे बघ, असं करू आपण तू...'' ''आम्हाला तसं करायची परवानगी नाही.'' प्रो. मानवेंद्रना अडवत ती म्हणाली.

''ओह! आय सी!'' मानवेंद्र विचारात गढल्यासारखे झाले. ''पण तू मला शिकवलंस तरी आमचे लोक हे मान्य करणार नाहीत. त्यांना ही कल्पित कथाच वाटेल. माझा मित्र एकदा असचं सगळ्यांना सांगत सुटला होता की, तो उडत्या तबकडीत बसलाय म्हणून. तो त्या तबकडीच्या आतील तांत्रिक माहितीही देत होता. पण सगळ्यांनी त्याला खुळ्यात काढलं. तसंच माझं होईल.''

टेली हसली अन् म्हणाली, ''मला मात्र तुम्हाला ही विद्या दिलीच पाहिजे. तशी मला वरून आज्ञाच आहे.''

असं म्हणून टेली त्यांच्याकडं रोखून पाहू लागली. काय होतंय हे कळण्याच्या आतच प्रो. मानवेंद्र झोपी गेले. काही वेळानंतर जाग आली, तो टेली निघून गेली होती. त्यांच्या हातात एक कागदाचा कपटा होता. त्यावर लिहिलं होतं, ''तुम्ही कोणत्याही रोग्याला हात लावून बरा करू शकाल. तुमच्या मेंदूत योग्य त्या प्रकारची सर्व माहिती भरलीय.''

प्रो. मानवेंद्र तिला शोधण्याचा निष्फळ प्रयत्न करू लागले. अंधार दाटला होता. शेवटी त्यांनी खड्ड्यातून मोटरसायकल उचलली. आणि कीक मारून जायला निघाले. - ह्या विचारात गढले असतानाच त्यांच्या खोलीच्या दारावर टकटक करण्याचा आवाज ऐकू आला. कुणीतरी, नव्हे डॉ. दासच आले असले पाहिजेत असं त्यांना वाटलं. ते नजरकैदेत असल्यापासून डॉ. दास व यशपाल यांच्याशिवाय बाहेरच्या कोणाशीच त्यांना भेटायची बंदी करण्यात आली होती. कुठून त्या दिवशी ती टेली नेमकी

आपल्यालाच भेटली आणि ही नसती पीडा देऊन गेली, असं त्यांना आता वाटायला लागलं होतं. किती दिवस मला असं खितपत पडावं लागणार आहे, हा विचार करत त्यांनी दरवाजा उघडला.

''ब्रेव्हो! प्रो. मानवेंद्र, इतके दिवस तुमच्या मोटरसायकलची पाहणी करण्याचं माझ्या लक्षातच आलं नव्हतं. कालच तिची कसून तपासणी केल्यावर चमकणारी एक चकती सापडली. तीवरून बऱ्याच गोष्टींचा उलगडा होण्याची आशा निर्माण झाली आहे.'' डॉ. दास आत येता येता आवेगानं म्हणाले.

प्रो. मानवेंद्र मात्र त्यांच्याकडं वेड्यासारखे पाहात राहिले...

□ ■ □ ■ □

# माणसाला हवं तरी काय?

दररोज पहाटे सहा वाजता मी कामावर जायला निघत असे. अर्थात रविवार सोडून. माझा दररोज दीड तास जाण्यात आणि दीड तास येण्यात असे तीन तास रेल्वे प्रवासात जात. माझ्या सगळ्या मित्रांनी आणि नातेवाईकांनी मला अनेक वेळा सल्ला दिला असेल की, मी जवळची नोकरी धरावी म्हणून. पण आपल्याला हवी तशी नोकरी मिळणं आणि पुन्हा जवळच, हे काही आपल्या हातात असतं थोडंच? आणि खरं सांगायचं म्हणजे मी तसा प्रयत्नही कधी केला नाही. मला हा तीन तासांचा प्रवास आवडायला लागला होता. ह्या तीन तासांत मी वाचन, कविता करणं, कथा लिहिणं, विज्ञान कथा-कादंबऱ्या (ज्यात fiction & fantasy भरपूर असते अशा) वाचणं, विश्वाच्या गूढतेविषयी विचार करणं, आयुष्याचा अर्थ शोधणं इ. विषय मी हाताळीत असे. इतर वेळेला खरं तर असा विचार करायला वेळच मिळत नाही. आपण नेहमीच धावपळीत जगत

असतो. या घरातून त्या घरात... घरातून दुकानात, घरातून रेल्वेत... रेल्वेतून ऑफिसात... ऑफिसातून पुन्हा घरात. आपलं आयुष्य म्हणजे जणू काही थाळीफेकीची रीले रेसच असते. त्यामुळंच आपले विचारही संकुचित व्हायला लागलेयत. आपण आपल्या दररोजच्या कटकटींच्या गुंत्यात पडून राहायला लागलो आहोत.

हा प्रवास करताना मात्र मी क्षणकाल सारं विसरते. विशेष म्हणजे वातावरणात कोणता ऋतू चालू आहे, हे मला प्रवासात कळतं. गाडीच्या खिडकीतून निसर्ग आपलं रूपडं दाखवीत असतो ना. वसंत ऋतूत झाडांना फुललेली नवीन पालवी या प्रवासातच मला दिसते. हिवाळ्यात बहरून आलेली शेतं ह्या प्रवासानंच मला दाखविली आहेत. एवढा आनंद लुटण्यासाठीच मी ह्या नोकरीवर फिदा आहे.

ह्या प्रवासात आणखी एक गोष्ट मला आकर्षून घेणारी आहे. ती म्हणजे वाटेवरच लागणारं 'विचित्रनगरी' स्टेशन. तुम्ही म्हणाल कदाचित की, या स्टेशनात नावाव्यतिरिक्त आणि काय ते वेगळं असणार! वरवर पाहता तुमचं म्हणणं खरंही आहे. ह्या स्टेशनात एक स्टेशनमास्तरची खोली व प्रवाशांसाठी विश्रांती कक्ष यापलीकडं फारसं बांधकाम नाहीच. सारं स्टेशन कसं उजाड वाटतं. दररोज ह्या स्टेशनावर क्षण दोन क्षण गाडी थांबते हे खरं. पण कोणीही उतारू तिथं उतरताना वा गाडीत चढताना मी पाहिला नाही.

कधीकधी मला गंभीरपणे असं वाटतं की, आपण या स्टेशनावर उतरावं! अगदी काही कारण नसताना. मजा म्हणून सहज स्टेशनाच्या जवळपास एक चक्कर मारावी अन् परत फिरावं. पण उगीचच म्हणून कोणतीही गोष्ट करायला आपल्याकडं वेळ असतो कुठं? आपण प्राधान्य आपल्या वाटणाऱ्या कामांना आधी देतो. मग जर का वेळ सापडलाच (बहुदा तसा सापडणं कठीणच) तर मग या उगीचच्याच गोष्टीकडं लक्ष देतो. आणि दुसरं म्हणजे आपलं जसं जसं वय वाढत जातं तसं तसं आपण अशा पोरकट कल्पना करायला धजावत नाही. आपल्याला जरी ती गोष्ट करून मनमोकळं वाटलं, तरी वयाला न साजेसा पोरकटपणा केला तर



जग काय म्हणेल ही भीती वाटत असते. वाढत्या वयाबरोबर पूर्वीच्या आपल्या निरागस चेहऱ्यावर प्रतिष्ठेची, दांभिकतेची, पोक्तपणाची अशा कितीतरी मुखवट्यांची पुटं चढत असतात. त्यातच आपण आपला मनमोकळेपणा गमावून बसतो... निरागसता हरवून बसतो.

बरं, हे सगळं झुगारूनही पोरकट कल्पना राबवावी म्हटलं तर ह्या धकाधकीच्या आयुष्यात त्या विचित्रनगरीत उतरायला वेळ कुठून आणायचा? सकाळी मी कामावर जायच्या गडबडीत असते; संध्याकाळी थकूनभागून घरी पोहोचायच्या. सुट्टीचा दिवस ह्या कामासाठी घालवावा असं म्हणाल तर हे फारच झालं. अहो, एक दिवस तरी आराम करू द्याल की नाही? पण माझ्या मनात ह्या स्टेशनवर केव्हातरी उतरायचं ही कल्पना मात्र घर करून राहिली आहे. कामावर जाता-येता दररोज ते स्टेशन मला खुणावत होतं. शेवटी न राहून मी एके दिवशी विचित्रनगरीला जायचं नक्की केलं. तो माझा वाढदिवस होता. कामाला सुट्टी टाकायची ठरवली. नेहमीचीच गाडी पकडण्यासाठी स्टेशनावर गेले. माझ्या वाढदिवसाची ही भेट म्हणजे माझी मलाच भेट देण्याचा प्रकार होता. पण स्वतःच्या मनातील पोरकट कल्पनेवर वैचारिक मात तर करायला हवी ना. म्हणून काहीतरी दणकट कारण शोधणं आवश्यकच होतं.

स्टेशनातील तिकीट घराकडं आले. खिडकीतून डोकावून विचारलं, ''विचित्रनगरीच्या एका तिकिटाला किती पडतील हो?''

त्या आतील कारकुनानं त्याच्या तिकिटांचे रकाने बघायला सुरुवात केली. जवळजवळ पाच मिनिटं तो तिकिटांचा रकाना शोधत होता. पण त्याला काही सापडेना. कदाचित फारच कमी माणसं तिथं जात असावीत. म्हणून ती तिकिटं अडगळीत पडली असण्याची शक्यता होती. मला आठवलं, मागे हॅलेचा धूमकेतू पाहण्यासाठी सारी माणसं आकाश चांगलं दिसतं म्हणून, वांगणीला जायला लागली. अचानक वांगणीच्या तिकिटांची मागणी वाढलेली पाहून तो कारकूनही चक्रावला होता. एवढंच नव्हे तर, कधी नव्हे ती रेल्वेला वांगणीची तिकिटे छापून घ्यायला लागली होती. अशा

प्रकारे हॅलेचा धूमकेतू रेल्वेतही पोहोचला होता.

''तुम्हाला बर्थ हवाय की सिटिंगचं आरक्षण करायचंय?'' अनिश्चिततेनंच त्या कारकुनानं मला विचारलं.

''नाही, दोन्हीही नाही. हे स्टेशन उपनगरी आहे.'' मी.

पुन्हा त्याची शोधाशोध सुरू झाली. शेवटी एकदाचं तिकीट त्याला मिळालं.

''सहा रूपये द्या.'' तो म्हणाला.

''अहो, माझ्या नेहमीच्या कामाचं स्टेशन त्याच्याही पुढं असताना, त्याचं तिकीट मात्र दोन रुपये आणि मधल्या स्टेशनाचं सहा. हे कसं काय? तुमची काहीतरी गल्लत होते आहे बघा.''

''मधल्या सर्व स्टेशनांची तिकिटे कमी खपतात म्हणून महाग आहेत.'' तो निर्विकारपणे म्हणाला.

''मग असं करा, मला शेवटच्याच स्टेशनाचंच तिकीट द्या. मी मध्येच उतरून जाईन.''

''नाही. तुम्हाला तसं करता येणार नाही. ज्या स्टेशनाचं तिकीट असेल त्याच स्टेशनावर उतरावं लागेल.''

''काय विचित्र कायदा आहे तुमचा.'' मी जरा वैतागातच बोलले. पण मुकाट्यानं सहा रुपये काढून त्याच्यासमोर ठेवले.

धावत पळत जाऊन नेहमीची गाडी पकडली. त्यातल्या त्यात कमी गर्दीचा डबा पाहून खिकडीजवळ बसले. तिकीट घरातील तो कारकून माझ्याकडं अशा विचित्र नजरेनं का पाहत होता याचा मी विचार करू लागले. पण हाती काही लागणार होतं का? कशी कोण जाणे मला डुलकी लागली. अन् जाग आली तो गाडी विचित्रनगरी स्टेशनावरून सुटण्याच्या बेतात होती तेव्हा. मी धडपडत उठले. दरवाजापाशी जाईतो गाडी सुटलीदेखील होती. कशीतरी धडपडत चालत्या गाडीतून उडी मारली. काही माणसं ओरडलीदेखील, 'मरायचंय का' म्हणून. मी क्षणभर बाकड्यावर बसून राहिले. गाडी धडाडत निघून गेली होती. सारा परिसर कसा शांत होता. ती शांतता पाहून जरा मनाला बरं वाटलं. एक दिवस तरी त्या गडबड, गोंधळापासून, कटकटीपासून आपण मोकळे झालो. मनाला खूप हलकं वाटलं.



अख्ख्या स्टेशनावर माझ्याशिवाय कुणीही नव्हतं. कुणाला तरी विचारावं म्हणून मी लांबवर नजर टाकली. पण कुणीही दिसत नव्हतं. मला जरा विचित्रच वाटलं. वाटलं, खरोखरच ही विचित्रनगरी दिसतेय, जिना उतरून मी तिकीटमास्तराच्या खोलीकडं जायला वळले. तो नेहमीप्रमाणं जसं इतर ठिकाणी असतं-तसा तो जाग्यावर नव्हता. मग मी प्रवाशांच्या विश्रांती कक्षाकडं वळले. तर तिथं सर्व कोचेस एकावर एक अशी एका कोपऱ्यात मांडून ठेवली होती. जमिनीवर धूळही बरीच साचली होती. तिथं असलेला नोटीसबोर्ड न्याहाळायला लागले आणि थबकलेच. त्या बोर्डवर मोठ्या अक्षरात लिहिलं होतं-

**येथे परतीची तिकिटे मिळत नाहीत**

''हा काय मूर्खपणा आहे?'' मी स्वतःशीच पुटपुटले. हे हे म्हणजे भयंकरच. मी तडक तिकीट घराकडं वळले. त्या तिकीट घराच्या खिडकीवरही एक कागद अडकवला होता- 'ही खिडकी काही दिवसांसाठी हिशेब तपासणीच्या निमित्ते बंद राहील.' मी चक्रावलेच. तिथं दुसरी खिडकीही नव्हती. स्टेशनावर अजूनही कुणी नजरेत येत नव्हतं.

'काय करावं बरं?' असा विचार करत असतानाच मी मनाशी म्हटलं, ''आलेय ना. मग जरा बाहेर पडून तर बघू. पाहू पुढचं पुढं. आपण इथं राहत नाही हे तर नक्की.'' असा विचार करीत स्टेशनाबाहेर पडले. बाहेर सूर्य नुकताच उगवला होता. सकाळचं प्रसन्न वातावरण होतं. बाहेरही कोणी दिसलं नाही. मला क्षणभर वाटून गेलं की, विचित्रनगरी निर्मनुष्य तर नाही? तेवढ्यात कोपऱ्यावर लक्ष गेलं. कोपऱ्यावर दोन दुकानं दिसत होती. एक होतं ब्युटी पार्लर आणि दुसरं होतं फोटो काढण्याचं. चला, म्हणजे या गावात माणसं आहेत तर.

उतरल्यापासून पहिल्यांदाच माणसांशी बोलायला मिळेल म्हणून मी ताबडतोब ब्युटी पार्लरकडं मोर्चा वळवला. खरोखर काही मिनिटांच्या एकटेपणालाही मी कंटाळले होते.

मला माझे केस कापायची जाणीव झाली. नाहीतरी बरेच

दिवसात केस कापायला वेळ मिळाला नव्हताच. तेव्हा मनात म्हटलं, ''चला, आज वेळ आहेच, तेवढ्यात केस कापवून घेऊ. ह्या नगरीतील ब्युटी पार्लरही पाहणं होईल.'' म्हणून मी रस्ता ओलांडून त्या ब्युटी पार्लरकडं वळले. किती बरं वाटलं. किती बरं वाटत होतं म्हणून सांगू. रस्त्यावर कुठंही कलकलाट, गोंगाट नव्हता की ट्रॅफिकही नव्हतं. सारं कसं आरामात आणि आलबेल होतं. वेगळ्याच जगात शिरल्यासारखं वाटत होतं.

''तुम्ही माझे केस कापून द्याल का?'' मी ब्युटी पार्लरमध्ये शिरल्या शिरल्याच प्रश्न केला.

''आम्ही नुसती केशरचना कधी करीत नाही. आम्ही फक्त संपूर्ण शरीर व चेहरामोहरा बदलण्याचं काम करतो.'' दुकानातील तरुणी हसतमुख चेहऱ्यानं प्रत्युत्तरली.

''म्हणजे? मी नाही समजले?''

''म्हणजे असं की, तुमच्या इच्छेप्रमाणं आम्ही तुमच्या रूपाचा कायापालट करतो.''

''हे कसं काय जमतं तुम्हाला?''

''अगदी सोपं आहे ते. तुम्ही तुम्हाला कसं रूप हवंय ते सांगायचं. म्हणजे डोळ्यांचा रंग, नाकाचा आकार, उंची तुम्हाला हवी असलेली मापं इत्यादी. मग आम्ही ही सगळी माहिती संगणकात प्रोग्रॅम करतो. तुम्ही मात्र त्या संगणकासमोरील त्याला जोडलेल्या खुर्चीत बसायचं. तो सगळी जुळवाजुळव करतो. पाच मिनिटं त्या खुर्चीत तुम्ही गोलगोल फिरा. आणि हळूहळू त्या पाच मिनिटात तुमचा चेहरा बदलतो. एवढा की तुम्ही स्वतःलाच ओळखू शकणार नाही. बस्स एवढंच.''

मी हे ऐकून चाटच पडले. विचित्रनगरी आपलं नाव सार्थ करीत होती. मला मौजच वाटली.

मी म्हटलं, ''वा! झकास कल्पना आहे. पण हा प्रकार खूप महागडा असेल नाही?''

''आम्ही पैसे नंतर घेतो. ते तुमच्या पसंतीवर अवलंबून आहे.''

''पण निदान अंदाज तरी सांगाल की नाही?''

''आम्ही साधारणपणे ग्राहकाच्या पैसे देण्याच्या कुवतीवर ते



ठरवत असल्याने आधी अंदाज कसा सांगता येईल बरं?'' तिनंच मला प्रश्न केला.

''ठिकाय, मला करून घ्यायचाय कायापालट.''

''उत्तम.'' ती हसून म्हणाली, ''आता असं करा, तुमचा संपूर्ण तपशील मला द्या, म्हणजे तुम्हाला तुम्ही कसं दिसायला हवंय ते सांगा.''

''मी कसं सांगू... पण मला सुंदर व्हायचंय एवढं नक्की.''

''हे फारच संदिग्ध बोलणं झालं. आम्हाला काय व कसं करावयाचं याबद्दल स्पष्ट शब्दात माहिती हवी.''

''म्हणजे असं पाहा की, सुंदरता म्हणजे आकर्षक दिसणं... लोकांना आवडणं...''

''तुमच्या डोक्यात सुंदरतेचं फारच अंधुक स्पष्टीकरण दिसतंय.'' त्या तरुणीनं खोल निःश्वास टाकत म्हटलं, ''असू दे. आमच्याकडं दुसराही मार्ग आहे. तुमचा हात इकडं करा जरा. हा असा ह्या बाजूला ताठ ठेवा.''

तिनं एका लहानशा यंत्रातून एक वायरिंगचं भेंडोळं काढलं. त्यातील दोन वायर माझ्या मनगटातील नाडीच्या जागी चिकटवल्या.

''ह्याला जीव-सौंदर्यशास्त्र म्हणतात. ह्यामुळं तुमच्या मनातील सौंदर्यकल्पनांची कंपनं ग्रंथित करता येतात. मी हे यंत्र सुरू करते. मग तुम्ही पाच मिनिटं जास्तीत जास्त सुंदर व आनंददायी विचार करा.''

मी तिच्या म्हणण्याप्रमाणं विचार करू लागले. 'मी आता सौंदर्याची पुतळी होणार... सर्व लोक माझ्याकडं वळून वळून पाहतील. आता माझा स्वतःचा चेहराही मला एकदम आवडायला लागेल. माझ्या शेजारून जाणाऱ्या प्रत्येकाला एक प्रकारचा धुन्द सुगंध आल्यासारखा वाटेल... त्यांना वाटेल की, ही कोण परी भूतलावर अवतरली आहे. माझे सगळे गंड नाहीसे होतील... माझा आत्मविश्वास दुर्दम्य होईल.''

''हं, पुरे.'' असं त्या तरुणीनं सांगितलं. आणि मनगटातील वायर्स काढून, संगणकासमोरील खुर्चीवर बसायला सांगितलं. त्या छोट्या यंत्रातून पंचकार्डासारखं एक कार्ड काढलं अन् ते

संगणकातील विविक्षित खाचेत सरकवत म्हणाली, ''ह्या कार्डात तुम्ही सौंदर्याविषयी केलेल्या सर्व कल्पना ग्रंथित झाल्या आहेत.''

नंतर माझ्या अंगावर एक तीव्र प्रकाशझोत पडला. मी पट्कन डोळे मिटले आणि काही कळायच्या आत गोलगोल वेगाने फिरू लागले. मला असं जाणवत होतं की, माझ्या अंगावर कुणीतरी हळुवारपणे हात फिरवतंय. माझ्या सर्वांगावर एक प्रकारे नवीन आभूषणं चढवतंय. वा, आता मी वेगळी दिसायला लागेन. जणू काही नव्यानंच आयुष्य सुरू करीन.

''हं आता उठा.'' ती तरुणी किंचित दुःखी चेहऱ्यानं म्हणाली. मी उतावळेपणानं ताबडतोब आरशासमोर धावले. स्वतःलाच आश्चर्यचकित करण्याच्या इराद्यानं डोळे मिटले. मग हळूहळू डोळे उघडून आरशात माझं नवं रूपडं पाहू लागले आणि त्या तरुणीवर उखडलेच. कारण मी होती तशीच होते... तशीच म्हातारी... चाळिशीची.

''निर्लज्ज कारटे. मला फसवतेस होय!''

''क्षमा करा मला. होतं असं कधीकधी.'' माझा अवतार पाहून घाबऱ्या स्वरात ती म्हणाली.

''आणि खरं तर असं आहे की, प्रत्येक स्त्रीला अंतःकरणातून तीच सर्व जगात सुंदर स्त्री आहे असं वाटत असतं. मग तिनं वरवर काही विचार केला तरीही अंतःकरणातील कंपनंच ह्या यंत्रांतून ग्रंथित केल्यामुळंही असं झालं असेल कदाचित. आपण पुन्हा प्रयत्न करून पाहू.'' दिलगिरीच्या स्वरात ती तरुणी माझा राग शांत करत म्हणाली.

''काही नको. तुम्ही स्त्रियांच्या मानसशास्त्राचा मार्मिकपणे उपयोग करून, त्यांना फसवण्याचा धंदा करताय.''

''अहो नाही, आजपर्यंत खूपजणींनी आपला कायापालट करून घेतलाय. एखाद दुसरी तक्रार सोडल्यास असं कधी घडत नाही.''

''पुरे झाली ही सारवासारवी. किती पैसे झाले तुमच्या ह्या उपद्व्यापाचे?''

''काही नाही.''



''मग हे तुम्ही मला त्रास दिल्याबद्दल.'' असं रागानं म्हणून मी तिच्या अंगावर दोन रुपये भिरकावले. अन् दाणदाण पाय आपटत दुकानाबाहेर पडले.

बाहेर पडल्यावर कुठं मोकळं झाल्यासारखं वाटलं. तसं पाहता मी काय अगदीच वाईट दिसत नव्हते. आज मनात विचार आला, 'आजच्या दिवसाची आठवण म्हणून फोटो तर काढून घेऊ.'

''तुमच्याकडं त्वरित फोटो काढून मिळतो का?'' मी फोटो स्टुडिओत असलेल्या दुकानदाराला विचारलं.

''अर्थातच. तुम्ही कॅमेऱ्यात सापडल्यानंतर बाहेरच्या खोलीत याल, तेवढ्यात फोटो तयार झालेला असेल.''

''उत्तम. मला एक पासपोर्ट साईजचा फोटो काढून हवाय?''

''कोणत्या वेळचा हवाय?''

''ते तुम्ही जास्त योग्यपणे सांगू शकाल. मला तुमच्या नवीन तंत्रज्ञानाची काहीच माहिती नाहीय.''

''अस्सं. कदाचित तुम्ही या नगरीत नव्याच आलेल्या दिसताय. आम्ही कधीच वर्तमानकाळातील फोटो काढत नाही. फोटो काढतो ते फक्त भविष्यातीलच. पाच वर्षं... दहा वर्षांनंतरचे.''

''अच्छा. जगातील कोणत्या व्यक्तींना असे फोटो काढावेसे वाटतात?'' मी जरा तुच्छतेनंच विचारलं.

''हं, असा एकदम निष्कर्ष काढू नका.'' तो फोटोग्राफर जरा दुखावलेल्या आवाजात बोलला.

''काही काळानंतर आपण कसे दिसणार हे पाहायची इच्छा असते मनात. नाही का?''

''मूर्ख आहात. झालं. तुमच्या इथं कोणतीही गोष्ट साध्या सरळ पद्धतीत होतच नाही का?''

''नाही. ह्या विचित्रनगरीत सर्व गोष्टी बाहेरच्या जगापेक्षा वेगळ्याच असतात.'' खांदे उडवीत उडवीत फोटोग्राफर म्हणाला.

''ठीक आहे. तर मी सत्तर वर्षांची म्हातारी असताना जशी दिसेन, तसा फोटो काढा माझा.''

त्यानं मला कॅमेऱ्यासमोर उभं राहायला सांगितलं. बाहेरून कॅमेरा नेहमीसारखा दिसत होता. फक्त त्याला एक फोनसारखी

आकड्याची तबकडी जोडलेली होती. त्यानं तबकडीकरून बोटं फिरवली आणि कॅमेऱ्याचं बटण दाबलं. एक तीव्र प्रकाशझोत पडला.

क्षणार्धात माझ्या हातात फोटो देत म्हटलं, ''हा घ्या तुमचा फोटो.''

मी पाहिलं तर फोटोत मी कुठचं दिसत नव्हते. नुसता पांढरा फडफडीत होता. कदाचित मी तो कागद उलटा धरला असेल असं वाटल्यामुळं मी कागदाची मागची बाजू पाहिली. पण तीही कोरीच होती.

मी म्हटलं, ''कदाचित तुमचा कॅमेरा हलला असेल वा त्यात बिघाड झाला असेल; म्हणून फोटो आला नाही.''

तो अत्यंत उदासवाणा चेहरा करून खाली मान घालून उभा होता. जणू काही नुकताच एखाद्या मर्तिकाहून जाऊन आलाय!

आणि... आणि क्षणार्धात ते भयंकर सत्य माझ्या डोक्यात शिरलं. कदाचित... कदाचित मी सत्तराव्या वर्षी... अरे देवा.

''आपण पुन्हा प्रयत्न करून बघू. जरा अलीकडचा काळ घेऊ. कदाचित तुमचा फोटो येईल.'' तो खोल गेलेल्या आवाजात म्हणाला.

''पण समजा नाहीच आला तर?'

''ते कसं सांगू मी आत्ताच. कधीकधी दहा-पंधरा वेळाही प्रत्येक वेळी अलीकडचा काळ घेऊन फोटो काढावे लागतात.''

''पण कशासाठी हे?''

''काही लोकांना हवं असतं की अजून त्यांची किती वर्षं उरलीयत हे पाहण्यासाठी. त्यांना मग त्या दृष्टिकोनातून त्यांच्या कामकाजाची आखणी करता येणं शक्य होतं. म्हणूनच आपण पुन्हा प्रयत्न करून पाहूया.''

''भयंकर, फारच भयंकर आहे हे. नको, मला नाही काढायचा फोटो.' मी अस्वस्थतेनं ओरडले.

''ते तुमच्यावर अवलंबून आहे. पण एक मात्र लक्षात घ्या की, त्यामुळं तुम्हाला नजीकच्या भविष्याची व्यवस्थित आखणी करता येईल, एवढं मात्र खरं. तसंच मरणाला सामोरं जाण्यासाठी तुम्ही तुमचं मनही तयार करू शकाल. एवढंच नव्हे तर तुमच्या



मुलाबाळांचं व नवऱ्याचंही मन तयार होईल; ह्या अप्रिय गोष्टीसाठी.''

''आभारी आहे तुमच्या सल्ल्याबद्दल. काय उत्तम देखावा आहे हा! माझं उरलेलं आयुष्य मी भविष्यात होणाऱ्या ह्या अटळ गोष्टीला सामोरं जाण्यासाठी, माझं व आप्तेष्टांचं मनोधैर्य तयार करण्यात घालवतेय. काय सुंदर वेळ जाईल नाही?''

''कशाला मी आत्ताच त्या गोष्टीसाठी अस्वस्थ व्हावं. अजून सत्तरी यायला खूप अवकाश आहे, तोपर्यंत यथेच्छ जगून घ्यावं.'' असा विचार करीत मी त्याच्या दुकानातून बाहेर पडले. रस्त्यात अनेक दुकानं होती. त्यावर आकर्षक बोर्डही लटकत होते.

''आमच्याकडील 'ऑप्टीमा ३३' वापरून धुतलेले कपडे घाला आणि उत्साह, आत्मविश्वास मिळवा.'' अशा प्रकारचा एक बोर्ड एका लाँड्रीवर लटकलेला होता, तर ''शिणवटा, मन व्यापून टाकणारी अस्वस्थता घालवा आणि 'स्मरणशील' गोळ्या घ्या आणि मेंदूला उत्तेजित करा'' अशी जाहिरात दुसरं दुकान करीत होतं.

चालता चालता मला एक पुस्तकाचं दुकान दिसलं. म्हटलं, चला, इथं तरी काही चांगली पुस्तकं मिळतील म्हणून मी त्या दुकानात शिरले. दुकानात अनेक खंडच्या खंड रचून ठेवलेले दिसत होते.

मी खाकरून दुकानदाराचं लक्ष वेधलं. तो कुठलं तरी पुस्तक वाचण्यात मग्न होता.

''ही पुस्तकं सगळी विक्रीलाच आहेत ना?'' मी निरर्थक प्रश्न केला. त्यावर त्यानं होकारार्थी मान डोलावली.

''ह्यात काही विज्ञान नवलकथाही असतील?''

''बराचशा तशाच आहेत.'' दुकानदार म्हणाला.

''असिमॉव्ह, कार्ल सागान किंवा मराठीतील निरंजन घाटे, जयंत नारळीकर असतील नाही?''

''नाही.'' तो तात्काळ उत्तरला, ''आम्ही फक्त प्रसिद्ध न झालेलंच साहित्य विकतो.''

''काय? हे खरंय?'' मी जरा निराशेनंच बोलले. आणि तेथील फडताळं चाळू लागले. ती सगळी नावं अनभिज्ञ होती.

''तुमच्याकडं सरिता शिंदेची पुस्तकं आहेत का?'' मी

अनपेक्षितपणे त्याला विचारलं.

''अर्थात. आहेत की. ते काय फडताळात त्यांचं वीस खंडातील साहित्य मांडून ठेवलंय.''

''आहा! किती मौजेचं आहे म्हणून सांगू. मी पाहू का जरा.''

त्यानं माझ्याकडं एक धूर्त नजर टाकून सावधपणे विचारलं, ''तुम्हीच त्या लेखिका आहात ना? सरिता शिंदे.''

''अरे, तुम्हाला कसं कळलं?''

''त्यात काय कठीण आहे. स्वतःचं प्रसिद्ध न झालेलं लिखाण खंडबद्ध केलेलं पाहून आनंदित होणारा त्या लेखकाशिवाय कोण असू शकेल बरं?'' पण मला सांगितलंच पाहिजे की, दुकानदार चाचरतपणे पुढं म्हणाला. ''आमच्या इथं इतर दुकानांपेक्षा जर वेगळी पद्धत आहे. आम्ही पुस्तकांची पूर्ण किंमत चुकती केल्यावरच त्यांना हात लावू देतो.''

''हे मी समजू शकते.'' मी उतावळेपणानं विचारलं, ''काय किंमत होईल ह्या वीस खंडांची?''

''आणि हेही लक्षात घ्या की, एकदा विकलेला माल आम्ही परत घेत नसतो वा पैसेही परत देत नसतो.'' दुकानदार इशारा दिल्यासारखा बोलला.

''अर्थातच.'' मी घाईनं म्हटलं, ''किती?'' मला नजरेनं तोलत तो म्हणाला, ''तीस.''

मी एकदम सुटकेचा निश्र्वास टाकला. फक्क तीस रुपये द्यायचे होते. मी पर्समध्ये हात घातला.

''हं, हं. तुम्हाला कळलं नाही मी काय बोललो ते.'' मला थांबवत तो म्हणाला, ''आम्ही पुस्तकांची विक्री पैशाच्या मोबदल्यात नाही करीत. तुमच्या ह्या २० खंडांची किंमत तीस वर्षं आहे.''

''कुणाची वर्षं?'' मी घाबरत विचारलं.

''तुमची. तुम्ही तुमच्या आयुष्यातील तीस वर्षं आम्हाला द्या आणि ह्या खंडांच्या लेखिका म्हणून प्रसिद्ध व्हा.''

एक क्षणभर थांबून तो पुढं म्हणाला, ''आम्ही सहसा पुस्तकांच्या लेखकांसमोर त्यांच्या लिखाणाची स्तुती करीत नाही. पण तुमचं लिखाण खरोखरच क्रांतिकारक आणि उत्कृष्ट दर्जाचं आहे. तुम्हाला फारच उत्तम जाण आहे.''



''पण तीस वर्षं मी दिली, तर मी जख्खड म्हातारी होईन की.'' मी पुटपुटले.

''त्या बदल्यात तुम्ही आयुष्यभर प्रसिद्धीच्या झोतात असाल त्याचं काय? तुमची पुस्तकं इतर भाषांमध्ये भाषांतरित होतील. तुम्हाला अनेक पारितोषिकं मिळतील. म्हणून तीस वर्षांचा सौदा काही फार महाग नाही तुम्हाला.''

''महाग नाही! आवडलं मला तुमचं बोलणं. माझ्या आयुष्यातील तीस वर्षं तुम्हाला देऊन मी सगळ्या उत्साहावर पाणी फिरवून त्याचा त्याग करायचा आणि जख्खड म्हातारी व्हायचं. मला काय म्हातारचळ लागलाय? नाही. अहो, ह्या तीस वर्षांत हे सगळं मीच प्रसिद्ध करीन की.''

''तुम्हाला ते शक्य होणार नाही.'' त्यानं साशंकतेनं माझ्याकडं पाहत म्हटलं.

''का नाही?''

''अनेक कारणं संभवतात. ह्या उद्योगात तुमचा महत्त्वाचा प्रचंड कालापव्यय तर होईलच. पुन्हा यशाची खात्रीही असणार नाही. अनेकजण तुमचा व्देष, मत्सर करणारे आहेत. तुमचे अनेक अपमानही होण्याची शक्यता नाकारता येत नाही. त्यामुळं तुमच्या मेंदूवर प्रचंड ताण पडेल. ह्या सगळ्यांशी झगडून तुम्ही काही प्रमाणात यशस्वी व्हालही. प्रसिद्धीस यालही पण किती मोठी किंमत देऊन! त्यासाठी प्रवास करणं, अनेकांची मनं वळवणं, त्यांच्या काही मागण्यांकडं मान तुकवणं इ. गोष्टी तुम्हाला कराव्या लागतील. ह्या सर्वांच्या बदल्यात किती सोपा मार्ग सुचवतोय मी. कुठलाही त्रास न घेता फक्त तीस वर्षांच्या मोबदल्यात जागतिक प्रसिद्धी, मानाचं जीवन...''

त्याला मध्येच अडवत मी म्हटलं, ''तुम्ही हे सगळं मला सांगताय? असतील काही मूर्ख लोक असे. पण मी नाही त्यातली.''

''माणसांना स्वतःविषयी जबरदस्त जादा आत्मविश्र्वास असतो. त्यामुळंच ती दुःखीही होतात. तरीही त्यांच्यातील 'मी' काही कमी होत नाही.'' अत्यंत निराश स्वरात दुकानदारानं खोल

गेलेल्या आवाजात म्हटलं. मी तडक दुकानाच्या बाहेर पडले. या विचित्रनगरीतील वैचित्र्याचा आता मला कंटाळा यायला लागला होता.

मला आता घरी जायची ओढ लागली होती. चांगले तीन तास मी निरुद्देश भटकत होते. पण आता घरी जायचं कसं? रस्ता शोधायला हवा होता. मी चालतच राहिले.

एका दुकानावरील बोर्डनं माझं लक्ष वेधून घेतलं. 'आदर्श विवाह मंडळ'. मी माझ्या नकळतच कुतूहलानं दुकानात शिरले.

एका हसतमुख तरुणीनं स्वागत करून नाटकीपणानं म्हटलं, ''तुम्ही तुमचं नाव आमच्या इथं दाखल करून आम्हाला सेवा करण्याची संधी द्याल अशी आशा करते.''

''कसली सेवा?'' मी गोंधळून प्रश्न केला.

''आम्ही आदर्श विवाह करून देतो नं?''

'पण खरंच का ते आदर्श ठरतात?''

''अगदी पूर्णपणे.''

''हे कसं काय शक्य होतं तुम्हाला?''

''ही विज्ञानाची करामत आहे म्हटलं. पहिल्यांदा आम्ही तुमच्या सगळ्या मानसिक चाचण्या घेतो आणि कोणत्या प्रकारचा माणूस तुम्हाला अनुरूप ठरू शकेल- म्हणजे असं की, त्याची शरीरयष्टी, त्याची बौद्धिक पातळी, त्याचे इतर गुण इ. ते ठरवतो. पूर्ण खात्री करून घेऊन मगच आम्ही तुम्हाला त्याच्याशी लग्न करायला सांगतो. हा खात्रीचा काळ पन्नास वर्षांचा असतो. दिलेला माणूस जर यदाकदाचित तुम्हाला अनुरूप वाटला नाही तर आम्ही तुम्हाला पन्नास टक्के रक्कम परत करतो. आणि दुसरी निवड करायला सांगतो. पण असं क्वचितच घडतं. फारच कमी वेळा अगदी एकशतांश टक्का म्हणा ना!

''हो. हे ठीक आहे. पण माझं तर आधीच लग्न झालयं.'' मी उत्तरले.

''असू दे. त्याच्याशी आमचा काही संबंध नाही. आम्ही तुमच्या विविध चाचण्या घेऊ. त्यातून असंही घडू शकेल की, तुम्हाला तुमचा नवरा अनुरूप वाटणार नाही. मग तुम्ही...''

''नाही. माझा नवरा आदर्शच आहे.'' मी अनवधानाने



ओरडले आणि दरवाजाकडं धावले.

रस्त्यावर आल्यावर वाटलं, आपण फार थकलोय. मेंदूला शिणवटा आलाय. ताबडतोब घरी जावंसं वाटलं. पण कसं जायचं? परतीचा मार्ग कुठाय? अरे देवा! आता काय करू मी? कशी सुटका करून घेऊ या विचित्रनगरीतून इथं तर प्रत्येक गोष्ट भविष्याचा विचार करून केली जातेय. सगळंच कसं. आखीव-रेखीव नुसतं सुख देणारं. आयुष्य सपक आणि चव नसलेलं. चुका करणं, प्रेम करणं, आशानिराशेचे हिंदोळे घेणं, दुःख भोगणं ह्या सर्व आवश्यक भावनांना तर इथं फाटाच दिलाय. नुसता सुखाचाच विचार करतात ही माणसं. कुठलाही अपघात नाही. आश्चर्यचकित होणं नाही. त्यामुळं आनंद, दुःख यांची खरी मजा चाखताच येत नाही. सगळ्या गोष्टी यंत्रात आणि यंत्रबद्ध केलेल्या बेचव आणि आळणी. छेऽ, मला इथून ताबडतोब दूऽर पळालं पाहिजे. अगदी आयुष्याच्या अंतापर्यन्त पळायला लागलं तरी बेहत्तर.

''तुम्हाला काही त्रास होतोय का?'' मागून एक अनोळखी आवाज आला अन् मी मागं वळून पाहिलं. सौहार्दपूर्ण नजरेनं माझ्याकडं एक उंचापुरा माणूस पाहत होता.

''तुम्हाला मी काही मदत करू शकतो का?''

त्याच्या या आपुलकीच्या शब्दांनी मी भारावले. माझ्या भावना आवरू शकले नाही मी. मी एकाएकी रडायला लागले. त्यानं माझ्या कमरेत हात घातला आणि एका बाजूला नेऊन म्हणाला, ''काय झालं ते सांगाल का मला? मी तुम्हाला नक्कीच मदत करीन.''

''मला माझ्या घरी जायचंय हो. मला घरी पोहोचवाल?'' मी रडतच विचारलं.

''तुम्हाला खरंच इथं कंटाळा आला?'' ''होय. कधी एकदा या विचित्रनगरीतून बाहेर पडतेय असं झालंय मला.''

''ठिकाय. अशा वेळी तुम्हाला मदत करणं माझं कर्तव्यच आहे,'' असं म्हणून त्यानं खिशातून एक छोटासा ट्रान्समीटर काढला व तोंडाजवळ नेऊन 'टॅक्सी' म्हणून हाक मारली.

एका मिनिटात टॅक्सी आमच्या समोर येऊन उभी राहिली.

''तुम्ही ह्या टॅक्सीत बसा. हा तुम्हाला योग्य ठिकाणी घेऊन

जाईल.''

''खरोखर तुमचे आभार कसे मानावेत हेच कळत नाही.'' टॅक्सीत बसत मी म्हटलं.

नंतर दहा मिनिटांतच टॅक्सी माझ्या घरासमोर येऊन उभी राहिली. उतरल्यावर मी विचारलं,

''किती पैसे झाले?''

''सगळे पैसे आधीच दिले गेले आहेत.'' चालक म्हणाला. मी त्याच्याकडं कृतज्ञतापूर्वक नजरेनं पाहिलं. तेवढ्यात तो पुन्हा म्हणाला,

''एक मिनिटं थांबा हं. हा डबा घ्यायला सांगितलाय तुम्हाला. हा घ्या.'' आणि तो निघून गेला.

मी रस्त्यातच तो डबा हातात घेऊन उभी राहिले. ह्या डब्यात काय असेल? विचित्रनगरीतील आणखी कोणती विचित्र वस्तू? मी ह्या विचारानं शहारले. हा विचार करत असतानाच अंतर्मनाच्या उतावळेपणामुळं माझ्या हातून डबा उघडला गेला होता. माझी जिज्ञासा मला स्वस्थ बसू देईना. मी डब्यात पाहिलं. ते एक सुंदर नाजुकसं लेडीज घड्याळ होतं. त्यावर लटकलेल्या कागदावर 'वाढदिवसाची भेट' असंही सुबक अक्षरात लिहिलेलं होतं.

मी मोकळ्या मनानं घराकडं पाहिलं. घरातून संगीताचे सूर ऐकू येत होते. खिडक्यांना झिळमिळ्या लटकलेल्या दिसत होत्या. हसण्या-खिदळण्याचे आवाज येत होते. मी धावतच घरात शिरले. सजवलेल्या टेबलावर केक तयार होता. ते फक्त माझी येण्याचीच वाट पाहत होते.

□ ■ □ ■ □

## कालप्रवासी

''अहो, जरा दुधाकडं बघा. नाहीतर ऊतू जाईल.'' सुलेखानं आपल्या पतीराजांना फर्मावलं आणि त्याच्या काळपट कोटाला बटनं लावू लागली. रवीनं-सुलेखाच्या नवऱ्यानं त्यावर 'हं' एवढीच प्रतिक्रिया व्यक्त करून आपल्या खोलीत नव्यानं तयार करत असलेल्या कालकुपीच्या कामात डोकं घातलं. थोड्या वेळानं भानावर आल्यावर तो त्याच्या खोलीतूनच ओरडला, ''काय म्हणालीस?''

सुलेखा तरातरा उठत त्याच्याजवळ आली. ''जळ्ळं मेलं तुमचं लक्षण'' म्हणत दुधाचं भांड उतरवायला स्वयंपाकखोलीत शिरली. रवी पुन्हा आपल्या कामात गढून गेला.

सुलेखाला वाटत राहिलं, आपल्या नवऱ्याचं हे वेड दिवसेंदिवस वाढत चाललंय. तो आताशा कशातही लक्ष घालत नाहीय. माझ्याकडं पाहणं तर सोडूनच द्या. पण मुलांकडंही पाहत

नाहीय. सतत आपला त्या खोलीत कोंडून काहीतरी खुडबूड करीत असतो. धड जेवतही नाही. कॉलेजचे काही तास प्राध्यापकीचे सोडले तर, तर सारा वेळ तो खोलीतच घालवतोय. खरं तर आपला नवरा चांगला फर्स्टक्लास फर्स्ट गोल्ड मेडलिस्ट इंजिनीयर आहे. त्यानं काहीतरी चांगला धंदा करावा व पैसे कमवावेत अन् सुखात आयुष्य घालवावं. पण कसचं काय, माझं नशीबच फुटकं! त्यानं डोक्यात त्या कालकुपीचं वेड घेतलंय. म्हणे या कालकुपीतून मी भूत व भविष्यकाळातही संचार करू शकेन. माझ्या संशोधनानं सारं जग स्तिमित होईल. असं कधी घडलंय का? कसलं बोडक्याचं संशोधन घेऊन बसलाय. छेऽ, कसं होईलं माझं? विचार करकरून डोकं फुटायची पाळी आलीय. निदान त्यानं पोराबाळांचा तरी विचार करायचा. पण नाही, त्याचं आपलं एकच-कालकुपी. हं, म्हणे कालकुपी! नक्कीच याला वेड लागलंय. पण मी करू तरी काय?

सुलेखा असा विचार करीत किती वेळ बसली होती, ते तिलाच कळलं नाही. आता हे रोजचंच झालं होतं. ती विचारांच्या तंद्रीतून जागी झाली ते सुमितच्या-तिच्या मुलाच्या-हाकेनं. सुमित म्हणत होता, ''आई, आज आपल्याला थोरातांकडं जायचंय ना? त्याच्या नव्या घरात त्यांनी आज गेट-टू-गेदर ॲरेंज केलंय हे विसरलीस वाटतं.''

''अरे हो, चल तू तयारीला लाग. मी पण लगेचच तयार होते,'' असं म्हणत ती तयारीला लागली. तयार होता होता तिचे विचार पुन्हा पाठशिवणीचा खेळ खेळू लागले.

...त्याचे मित्रही त्याच्याकडं यायचे हल्ली कमी झालेयत. एखाद-दुसरा आला तरी हा त्यांच्याशी नीट बोलत नाही. बिचारा गप बसून नुसता कंटाळून जातो. ह्यांचं असंबद्ध कालकुपीविषयीचं बोलणं त्याला कळत नाही. मग तो पुन्हा तोंडच दाखवत नाही. हल्ली शेजारीही कुजबूज करू लागले आहेत. त्यातल्या त्यात दारूच्या व्यसनापेक्षा हे बरं, नाहीतर वाटोळं व्हायला वेळ लागला नसता. हीच एक समाधानाची बाब आहे.

''अगं आई ग, झालं की नाही तुझं,'' सुमितनं विचारलं.

''झालं रे, चल निघूया आपण'' असं म्हणत रवीच्या



खोलीकडं पाहत ''आम्ही जाऊन येतोच, जर काही लागलं तर खाऊन घे'', असं म्हणत ती दोघं बाहेर पडली.

इकडं रवी त्याच्या कालकुपीत एवढा गुंग झाला होता की, सुलेखा अन् सुमित बाहेर गेल्याचंही त्याच्या लक्षात आलं नाही.

''आता ही कालकुपी जवळजवळ पूर्ण होत आलीय.'' रवी स्वतःशीच पुटपुटत होता. ''ह्या कालकुपीवरून एक शेवटचा हात फिरवला की झालं. हा प्रयोग पूर्णत्वास गेला आहे की नाही हे पाहण्याचा आता एकच मार्ग आहे-कालकुपीची चाचणी घेणं. तरच आपल्याला त्यातील त्रुटी जाणवतील. त्या दुरूस्त करून आपण कालकुपीतून प्रवास करू शकू-हवं त्या काळात.''

त्यानं त्या कालकुपीचं एक विशिष्ट बटण दाबलं. एक झगझगीत प्रकाशशलाका कुपीतून बाहेर पडली. त्याची खोली गोलाकार होऊ लागली. दोन ॲंटेना खोलीच्या छतावर उघडले गेले. कुपीतील एका भागात संगणकासमोर एक खुर्ची उघडली जाऊन, संगणकावरून माहिती प्रसारित व्हायला लागली. संगणक प्रश्न विचारत होता, कुठल्या काळात जायचंय? अनेक रंगीत दिवे लुकलुकू लागले... डाव्या बाजूच्या पडद्यावर बाहेरच्या जगाचं प्रतिबिंब दिसत होतं.

आनंदानं रवीनं बटण बंद केलं. सारं कसं व्यवस्थित घडलं होतं. त्यानं मग पुन्हा एकदा कालकुपीची रचना व्यवस्थित न्याहाळली. कुठं काही चुकून एखादी जोडणी करायची राहिली ना ते नीट पाहिलं. शेवटचा स्क्रू पिरगळला. बाहेर तिन्हीसांजा झाल्या होत्या. हळूहळू अंधार आपले बाहू पसरून सर्वांना आपल्या कवेत घेत होता. रवीला खोलीत दिवा लावायचीही शुद्ध राहिली नाही. त्याच्या हृदयाचे ठोके वाढू लागले होते. पण त्याचं मन मात्र आनंदाच्या सागरात उचंबळत होतं. त्यानं केलेला प्रयोग आज यशस्वी झाला होता. त्याची इच्छा पूर्ण होण्याच्या मार्गावर होती. त्याची टिंगलटवाळी करणाऱ्यांना तो आता चांगलाच धडा शिकवणार होता.

खरोखरच आनंदाचा क्षण होता तो!

-रवीला वाढत जाणारा आवाज ऐकू येऊ लागला.

पाठोपाठ मोठी प्रकाश शलाका झळकली. त्यानं त्याचे डोळे दिपून गेले. त्यांच्या समोर एक सोनेरी कपडे घातलेला दहा फूट उंच आणि धिप्पाड माणूस उभा राहिला. त्याचा चेहरा हसरा होता. तो रवीकडं आणि त्याच्या कालकुपीकडं आलटून पालटून पाहत होता. रवीला एकदम धक्काच बसला. त्यानं डोळे मिटले. त्याला वाटलं, 'कदाचित आपल्या डोक्यावर खूप ताण पडल्यामुळं, आपल्याला त्रास झाला असेल. म्हणून त्यानं डोळे मिटून अंग शिथील करण्याचा प्रयत्न केला. क्षणभरानं पुन्हा डोळे उघडले. तो प्रकाश तेवढ्याच प्रमाणात अजूनही येत होता. आणि तो दहा फुटी माणूसही तसाच हसतमुख उभा होता. त्याच्याकडं स्नेहपूर्ण नजरेनं पाहत होता.

''तू आत कसा आलास? तुला काय पाहिजे?'' अचानकपणे रवीच्या तोंडून प्रश्न बाहेर पडले.

रवीचं बोलणं संपतं न संपतंय तो दहा फुटी कमालीच्या शांतपणे आणि हसत हसत म्हणाला, ''आम्ही बाविसाव्या शतकातील मध्य कालातील आहोत. हे वर्ष आहे १ मे २१६७.''

''म्हणजे सध्या तुमच्याकडंही इथल्याप्रमाणं वसंत ऋतू चालू आहे तर.'' रवी उगाचच काहीतरी बोलून गेला, इतका तो भांबावला होता.

''मला हे जाणून घ्यायचंय की, मी योग्य ठिकाणी आलोय की नाही. तू रवी... रवी काटदरेच ना? १९५० साली जन्मलेला... गोल्ड मेडॅलिस्ट इंजिनीयर. होय ना?''

रवीला त्या दहा फुटी माणसानं, आपल्याबद्दलची केलेली अचूक विधानं ऐकून आश्चर्य वाटलं. काही न बोलता त्यानं नुसतीच होकारार्थी मान हलवली. तो पुढे बोलतच होता.

''आम्हा इतिहास संशोधक कालप्रवाशांचं एका मुद्यावर एकमत होत नव्हतं. माझ्यासह काहीना असं वाटतं की, कालप्रवासाचा सिद्धांत मांडणारा माणूस प्रा. रवी काटदरे म्हणजे तू आहेस. तूच सर्वात पहिली कालकुपी तयार केलीयस. तर इतर काही म्हणतात की, नाही, कालकुपीचा शोध एकविसाव्या शतकातील आहे...''



हे वक्तव्य ऐकून रवीच्या पोटात आनंदाच्या उकळ्या फुटू लागल्या.

''...त्यांचं असं म्हणणं आहे की, हा शोध २१ व्या शतकातील फ्लोरीडा ब्राऊन या अमेरिकन विदूषीनं लावला. तिनंच कालप्रवासाची कल्पना सर्वप्रथम मांडली.''

''फ्लोरीडा, अरे हाट.'' उपहासाने रवी बोलला, ''हा मीच आहे की, ज्यानं कालप्रवासाचा पहिल्यांदा उच्चार केला आणि मीच माझ्या ह्या हातांनी पहिली कालकुपी तयार केली. ही पाहा.'' असं म्हणत अभिमानानं त्यानं कालकुपीकडे अंगुलीनिर्देश केला.

तो दहा फुटी त्या कालकुपीजवळ गेला. तिला न्याहाळीत म्हणाला, ''तर ही आहे सर्वात पहिली कालकुपी. वा!'' त्याच्या चेहऱ्यावर आनंद ओसंडत होता.

''कालकुपीचा संशोधक मीच आहे; हे निश्चित करण्यासाठी तुला इथं का यावं लागलं? मागच्या कागदपत्रातील नोंदी पाहूनही ते तुम्हाला कळलं असतं की. एवढा सोपा मार्ग सोडून हा द्रविडी प्राणायाम करायची काय गरज होती?'' रवीनं आश्चर्यमिश्रित कुतूहलानं विचारलं.

त्यावर दहा फुटी भुवया उंचावून म्हणाला, ''सोपा मार्ग? हे तू म्हणतोस? अरेरे!'' किती मागासलेले आहात, असा भाव चेहऱ्यावर आणून दहा फुटी पुन्हा बोलू लागला, ''तुमच्या काळी नवनवीन संशोधनांच भांडार नुकतंच खुलं झालं होतं. तुम्ही नवनवे शोध लावत होता. अवकाश उड्डाणात प्रगती करीत होता. येणारी माहिती संगणकात प्रोग्रॅम करून ठेवत होता. पुन्हा हवी तेव्हा ती तपासून पाहू शकत होता. अवयव रोपणे, टेस्ट ट्युब बेबी... वनस्पती तुम्ही नव्यानंच निर्माण करू लागला होता. ही सगळी माहिती साठवून ठेवणं काही कठीण नव्हतं. नुकतीच सुरुवात होती तेव्हा. पण आमच्यापुढं मात्र ही माहितीची दालनं एवढी खच्चून भरली आहेत की, १२ व्या पिढीतील संगणकही योग्य ती माहिती आम्हाला देण्यास बराच वेळ घेतो. आमच्या काळाच्या वेगाची तो बरोबरी करू शकत नाहीय. आणि पद्धतही अत्यंत महागडी होत चाललीय. माहिती शोधून काढणं हेही किचकट काम झालंय.

त्यापेक्षा कालप्रवास करणं जास्त सोपं अन् वेळ बचत करणारं तंत्र वाढीस लागल्यामुळं माहिती मिळवण्यासाठी कालप्रवास करणं हेच जास्त योग्य वाटतं. वेळ आणि ऊर्जा दोन्हीचीही बचत होते. कामंही झटपट होतात.''

''ह्यापेक्षा आणखी सोपा मार्ग नाही का तुम्हाला शोधता येणार?'' रवीनं मध्येच प्रश्न केला.

''आमचा तसा प्रयत्न चालू आहे.'' तो दहा फुटी जरासा खिन्नपणे म्हणाला, ''सध्या आमचं एवढ्या बारीकसारीक गोष्टीत स्पेशलायझेशन झालंय की प्रत्येकाची विशेषता लक्षात ठेवणंही कठीण झालंय. तरीही संशोधन न करणं हा काही त्याला पर्याय होऊ शकत नाहीय, शेवटी माणसाची सर्जकता म्हणजे त्याची जिज्ञासू वृत्तीच ना? तिच्यामुळंच तर आम्ही आज अनेक ग्रहांवर वस्ती करू शकलो आहोत. असो. मला वाटतं आता मी निघायलाच हवं माझ्यातील ऊर्जेचा साठा कमी होत आलाय. तो संपण्याच्या आत पोहोचलंच पाहिजे. अच्छा.''

रवीला एकदम क्लिक असा अवाज ऐकू आला अन् तो दहा फुटी क्षणार्धात अदृश्य झाला. त्याच्या समोर काळोखी पसरली. पण क्षणभरच. पुन्हा एक विचित्र आवाज आला. पुन्हा एकदा प्रकाशझोत त्याच्या डोळ्यावर पडला. डोळ्यांवर हात ठेवून रवी किलकिल्या नजरेनं पाहायला लागला. त्याला पुन्हा एक कालप्रवासी पहिल्यापेक्षाही उंच आणि चांदीच्या रंगाचे घट्ट बसणारे कपडे घातलेला दिसला. तो पहिल्यापेक्षाही घाईगर्दीत आल्यासारखा वाटत होता.

आल्या आल्याच त्यानं सुरुवात केली, ''हाय! रवी... रवी काटदरे तूच आहेस ना. सर्वात पहिल्या कालकुपीचा शोधक? उत्तम. अरे मी आमच्या लोकांना हेच पटवून द्यायचा प्रयत्न करत होतो.'' रवीच्या प्रत्युत्तराची वा त्याच्या प्रतिक्रियेची वाट न पाहता तो घाईघाईत बोलत होता, ''कुठं-कुठं आहे ती कालकुपी?''

रवी उठला आणि त्याला पलीकडेच असलेली कालकुपी दाखवली.

''दिसतेय अगदी साधी पण नक्कीच उपयुक्त आहे.'' तो



रवीला म्हणाला. ''आणि हे बघ, ही डबीही तुला आवडेल'' त्यानं रवीचं लक्ष त्याच्या छातीवर रूळणाऱ्या हिंगाच्या डबीएवढ्या डबीकडं वेधलं.

''काय आहे ते?'' रवीची पृच्छा.

''हा आहे 'वैश्विक दुभाष्या' हा ह्या विश्वातील कोणत्याही भाषेचं आपल्या भाषेत भाषांतर करतो. मी जो तुझ्याशी बोलतोय, तो ह्याच्यामुळंच. अगदी हलका आहे बघ,'' असं म्हणून त्यानं ती डबी गळ्यातून काढून रवीला दिली.

''अरे, काहीच वजन नाही. किती हलकी आहे. गळ्यात लटकवली तर कळणार पण नाही. झकास.''

''घेऊन टाक तुला. अवकाशात कालप्रवास करताना तुला ह्याचा उपयोग होईल. माझ्याकडून भेट समज. तुला आमच्याकडे तर असे एकापेक्षा एक सरस दुभाष्ये तयार करण्याचे कितीतरी कारखाने दिसतील?''

''कोणत्या शतकातले आहात तुम्ही?'' रवी ती डबी गळ्यात अडकवत बोलला.

''आम्ही ना, २३ व्या शतकाच्या शेवटच्या दशकातील आहोत. भयानक वेगवान दशक! आमच्याकडं यांत्रवही पुनरुत्पादन करू शकतात. त्याच्यातही जैविक उत्क्रांती होतेय. तारका-इंजिनीयरिंग या विषयात गती प्राप्त केलीय आम्ही.''

''तुमच्याकडंही कालकुपीचा पहिला संशोधक म्हणजे मी, याविषयीची नोंद असलेली कागदपत्रे ठेवली नाहीत.'' खिन्नपणे रवी म्हणाला, ''आत्ताच २२ व्या शतकातील एकजण येऊन गेला.''

''नाही. त्याच्यात नि आमच्यात कोणत्याही प्रकारचं साम्य नाही. एवढंच काय, पण त्यानंही अशा प्रकारच्या सफरी काढल्या असतील याची आम्हाला माहिती नाही. ह्या महापुरातून योग्य ती घटना शोधून काढणं अशक्यच आहे. डोकेदुखी आणि खर्चिकही आहे. बाविसाव्या शतकातील लोकांना कदाचित ते शक्य होत असेल पण आम्हाला? छेऽ, या वेगळ्या आयुष्यात आम्ही नुसते वेगात असतो. एका जागी बसून काम करणं ही नुसती कवीकल्पनाच राहिली आहे. आताही मला वेळ नाहीय. मी प्रचंड

घाईत आहे. एवढं बोलून तो नाहीसा झाला. रवीला कळलंदेखील नाही.

रवीनं आता शांतपणे डोळे मिटले. त्याला शीण यायला लागला होता. पण हा काही शेवटचा प्रवासी नव्हता. त्याच्यानंतर काही क्षणांच्या शांततेनंतर परत परत असे कालप्रवासी येऊ लागले. तिसरा...चौथा...पाचवा...सहावा...दहावा जो आला तो तिसाव्या शतकातील होता. त्यानं इंद्रधनुषी रंगाचे कपडे घातलेले होते. त्याचे डोळेही मोठे आणि भेदक होते. चेहरा हसरा होता. त्याच्या डोळ्याला सोनेरी पट्टी बांधलेली होती. रवीला वाटलं की, त्या पट्टीतूनच त्याच्या मेंदूपर्यंत विचार पोहोचत असावेत. कदाचित समोरच्या वस्तूची प्रतिमा आणि शब्दही त्या पट्टीद्वारेच त्याच्या मेंदूत चितारले जात असावेत.

''मी तिसाव्या शतकातला...'' त्यानं आल्या आल्याच आपली ओळख करून द्यायला प्रारंभ केला.

''मला माहिताय, तुमच्याकडं माहितीचा प्रचंड स्फोट झालेला आहे. आणि तुम्हाला योग्य ती माहिती त्यातून काढणं अवघड झालंय.'' रवी उपहासानं बोलला.

''आमच्या कालप्रवास शास्त्रज्ञांना सध्या एका मोठ्याच ऐतिहासिक प्रश्नानं घेरलंय. त्यांना हे निश्चित करायचंय की, ह्या कालप्रवास शास्त्राचा जनक कोण?''

''तो मी...मीच आहे ह्या शास्त्राचा जनक, पण मला आता क्षमा करा. त्याच त्याच प्रश्नांची उत्तर देण्याचा मला कंटाळा आलाय. तेव्हा हे अनाहूत पाहुण्यांनो तुम्ही आता जा. मला थोडा वेळ एकटं सोडा. फार थकलोय मी.''

-नि हा दहावा कालप्रवासीही वातावरणात अदृश्य झाला. रवी त्याचं अदृश्य होत जाणं डोळे ताणताणून पाहत होता.

त्याच वेळेस त्याची बायको-सुलेखा आणि मुलगा सुमित थोरातांच्याकडची पार्टी आटोपून घरी परतले होते. सुमितला झोप अनावर झाली होती; म्हणून तो तसाच त्याच्या खोलीत झोपायला गेला. सुलेखाही आवराआवर करून झोपायची तयारी करू लागली होती. तेवढ्यात तिला रवीच्या बोलण्याचा आवाज त्याच्या खोलीतून



आला. नीट ऐकल्यावर तिला जाणवलं की, तो स्वतःशीच बोलतोय. काळजीयुक्त चेहऱ्यानं ती झोपायला गेली. रात्री मधून मधून रवीचा विचित्र आवाज तिच्या झोपेचं खोबरं करीत होता. तिला त्याच्या खोलीतून भगभगता प्रकाशही दिसला.

''हा मूर्ख बहुतेक घराला आग लावणारसं दिसतंय. उद्याच्या उद्या याला मेंटल हॉस्पिटलमध्ये दाखल केलं पाहिजे. तेव्हाच जरा शांतता मिळेल.'' असं स्वतःशीच पुटपुटत ती झोपण्याचा प्रयत्न करू लागली.

जेव्हा रवीच्या खोलीत मध्यरात्रीपर्यंत बाविसावा कालप्रवासी दृश्यमान झाला; तेव्हा तो अगदी दमून गेलेला होता. त्याला डोळे उघडे ठेवणंही जड जात होतं. त्याच्या घशातून खरखरणारा विचित्र आवाज येऊ लागला होता. त्याला हे सगळं असह्य झालं होतं. त्यानं त्या तिरीमिरीत त्याच्या हाताला लागलेला एक लोखंडी चेंडूसारखा तुकडा उचलला आणि त्या बावीसाव्या कालप्रवाशाच्या अंगावर वैतागाने भिरकावला. तो कालप्रवासी घाबरून ताबडतोब अदृश्य झाला.

रवीने हातात वैश्विक दुभाष्या घेतला व त्याच्या कालकुपीतील खुर्चीत जाऊन बसला. समोरच्या संगणकावर तो आकडे फिरवू लागला आणि कालकुपी सुरू करणारं लाल बटण दाबलं. त्याला २२६५ सालापूर्वीच्या पुरातन ग्रीक शहरात-सिरीकसमध्ये कालप्रवास करून जायचं होतं.

रवीला चक्कर आल्यासारखं वाटलं. त्याची खोली गोल गोल फिरायला लागली. सगळी प्रमाणे बदलली. वस्तू प्रथम चपट्या झाल्या आणि नंतर लगेचच लहान लहान होऊ लागल्या. इतक्या सुक्ष्म की, रवीला या डोळ्यांनीही दिसेनात. त्यालाही प्रचंड दडपण आल्यासारखं वाटलं आणि त्यानं डोळे मिटून घेतले.

जेव्हा त्याची कालकुपी गुळगुळीत दगड गोट्यांनी बनवलेल्या घरासमोर थांबली, तेव्हा त्यानं डोळे उघडले. त्या घराच्या गच्चीकडं लक्ष गेल्यावर रवीला वाटलं, उन्हाळ्यात ह्या गच्चीवर झोपायला किती मजा येत असेल. वातावरण कसं उबदार आहे. सगळा शीण कुठल्या कुठं पळाला. त्या घराच्या ऐसपैस ओसरीवर

त्याला एक रुंद खांद्याचा, भरपूर दाढी राखलेला, डोळ्यात बुद्धिमत्तेचं तेज असलेला एक माणूस कंपास हातात घेऊन काहीतरी गणितातील कूट प्रश्न सोडवण्याच्या पावित्र्यात दिसला.

''तुम्हाला तुमचा प्रश्न सुटण्यात यश मिळो!'' रवी त्याच्याजवळ जात म्हणाला. त्याचं रूपांतर तत्क्षणीच त्याच्याजवळील वैश्विक दुभाष्यानं पुरातन ग्रीक भाषेत केलं.

''तुम्ही मला त्या महान माणसाचं-आर्किमिडीजचं घर कुठं आहे ते दाखवू शकाल काय?'' रवीनं नम्रपणे विचारलं.

''तुम्हाला त्याच्याकडून काय हवंय?'' तो माणूस जरा रागानंच म्हणाला. रवीला असंही दिसलं की, तो आलेला अथवा त्याचा दुभाष्या पाहून त्या माणसाला आश्चर्य वाटलेलं नाहीय.

''मला त्या विद्वान माणसाशी जरा बोलायचंय.'' रवी चाचरतच हळुवारपणे म्हणाला, ''मला पाहायचंय की, खरंच त्यानं आर्किमिडीजचं तत्त्व कसं शोधून काढलं? मोठ्या संख्येची वर्गमुळं काढायची पद्धत कशी तयार केली त्यानं...''
रवीचं वाक्य अर्धवटच राहिलं. कारण त्या ग्रीक माणसाचा चेहरा संतापानं फुलला होता. तो अशा आवाजात बडबडला की दुभाष्याही त्याचं भाषांतर करण्यास असमर्थ ठरला.

''माझं काय चुकलं? मला तर त्यांची फक्त भेट-''

''त्याची भेट? त्याची भेट घ्यायला आज किती लोक येणार आहेत. अन् तेच ते प्रश्न विचारणार आहेत?'' एवढं बोलून त्या ग्रीक माणसानं त्याच्या हातातला कंपास रवीच्या दिशेनं फेकला. रवी सावध होता म्हणूनच तो त्या कंपासच्या तडाख्यातून वाचला. मग रागानं बडबडू लागला, ''तुम्ही सर्व मूर्ख आहात. तुम्ही रानटी आहात. आम्हाला पुरातन ग्रीकांच्या सहिष्णू वागणुकीविषयी शिकवलं गेलंय. पण... पण इथं पाहतो रानटीपणा. काहीतरी चूक झालीय. आमच्या इतिहास संशोधकांकडून निश्चितच. आर्किमिडीज कुठं राहतो हे विचारणं काय गुन्हा आहे?''

''मीच तो आर्किमिडीज.'' तो ग्रीक माणूस उदासपणे आणि दिलगिरीच्या स्वरात म्हणाला, ''मला क्षमा कर अनोळखी माणसा, तुला इजा करण्याची माझी इच्छा नव्हती. पण मी तरी काय करू?



गेला आठवडाभर सतत तुझ्यासारखी अनोळखी माणसं येताहेत. अन् तेच ते प्रश्न विचारताहेत. मग मी कितीही शांत असलो तरी मानसिक तोल ढळणार नाही काय? पहिल्यांदा तो उंच सोनेरी कपडे घालून आला...''

''नंतर, चंदेरी कपडेवाला'' रवीनं वाक्य पूर्ण केलं.

''तुला कसं माहिती?'' आर्किमिडीजनं संशयी नजरेनं रवीकडं पाहत विचारलं, ''तुझे ते मित्र तर नव्हेत?''

''नाही. तसं काही नाही. अशाच प्रकारे ते माझ्याकडंसुद्धा आले होते.''

''हं. म्हणजे तुम्हीसुद्धा विद्वान आहात तर! आर्किमिडीजच्या चेहऱ्यावर आता कुठं हास्याची लकेर झळकली.

''कदाचित तुम्हीच मला सांगू शकाल की, आर्किमिडीजचं तत्त्व काय आहे ते. ती माणसंही हेच विचारत होती आणि तुम्हीही.''

''ठिकायं'' रवीनं बोलायला सुरुवात केली. ''तुम्हाला हे तर आठवत असेलच की, कोणताही पदार्थ पाण्यात बुडवला असता त्याच्या वजनात घट होते.''

''अरे, हे सगळं मला माहीत आहे. फार पूर्वीच मी हे दाखवून दिलंय की, पदार्थ पाण्यात बुडवला असता तो त्याच्या आकारमानाइतके पाणी विस्थापित करतो आणि त्याच्या वजनातही घट होते. आणि वजन कमी होण्याचं कारण म्हणजे...''

''पाण्यात वा कोणत्याही द्रवात कार्य करणारं उत्प्लाविता बल म्हणजे खालून वरच्या दिशेन आणि गुरुत्वीय बलाच्या विरुद्ध दिशेनं कार्य करणारं बल.'' रवीनं आर्किमिडीजचं वाक्य पूर्ण केलं. अन् दोघेही हसायला लागले.

''आणि हे कुठल्याही पदार्थाच्या बाबतीत ह्या विश्र्वात कुठंही लागू आहे.'' आर्किमिडीज.

''हां ह्यालाच आर्किमिडीजचं तत्त्व म्हणतात महाशय. आमच्याकडं प्रत्येक शाळेतील अभ्यासक्रमात हे प्रसिद्ध तत्त्व घातलेल आहे. रवीचं हे बोलणं ऐकल्यावर आर्किमिडीज, तत्त्वाच्या रूपानं अजरामर असल्याचा आनंद लपवू शकला नाही. तो आनंदानं नाचू लागला. 'युरेका, युरेका' म्हणून ओरडू लागला.

आर्किमिडीजनं त्याला घरात बोलावलं अन् म्हणाला, ''आपल्याला खूपच बोलायचंय.'' त्यानं मग घरातील अनेक भेंडोळी बाहेर आणली. आणि एकेक उघडून दाखवू लागला.

''ह्या, ह्या भेंडोळ्यात माझं सगळं ज्ञान साठवलंय. बघ तुला काय पाहिजे ते.''

रवीनं एक भेंडोळं घेऊन उलगडलं. तो नीट निरखून पाहणार तोच आर्किमिडीज म्हणाला,

''अरे ते पाहू नकोस. ते अजून अर्धवट आहे. त्यावर अजून बरंच काम करायचंय.'' असं म्हणून त्यानं त्याची गुंडाळी केली तरीही रवीनं काही गोष्टी त्यातल्या पाहिल्याच. पण त्याला तेवढ्या क्षणात नीट पाहता आल्या नाहीत.

रवी त्यांना काही प्रश्न विचारणार एवढ्यात रवीला त्याच्याजवळील इलेक्ट्रॉनिक उपकरणानं सूचना दिली की, त्याच्या-जवळचा ऊर्जेचा साठा आता संपत आलाय. तो निघायची घाई करू लागला. जाता जाता तो आर्किमिडीजना म्हणाला, ''तुम्हाला तुमचं भविष्य ऐकायचंय?'' आर्किमिडीजच्या चेहऱ्यावर रवीला उत्सुकता दिसली. तो सांगू लागला, ''तुम्ही यंत्रशास्त्रात आणि भूमितीत अनेक शोध लावणार आहात. त्यामुळं तुमचं नाव अजरामर होईल. तुम्ही तुमच्या राजाच्या आणि सिरीकसच्या नागरिकांच्या गळ्यातील ताईत व्हाल. सगळे तुमच्यावर अलोट प्रेम करतील. तुम्ही प्रक्षेपणशास्त्रातही एवढी गती निर्माण कराल की त्यामुळं तुमच्या राजाचा युद्धात जय होईल. तुमचा शत्रू पराभूत होईल पण... पण...''असं म्हणून एक क्षण रवी थांबला.

''अरे, पण काय? सांगा ना लवकर,'' आर्किमिडीजनं कमालीच्या उत्सुकतेनं विचारलं.

''पण, तुमचा शत्रू सैनिक तुम्ही वाळूवर कूट प्रश्नाचा गुंता सोडवत विचारांच्या तंद्रीत असताना, त्याच्या तलवारीनं मारून टाकील. मरता मरता तुम्ही एकच वाक्य ओरडून सांगाल की, 'माझ्या ह्या कूट प्रश्नाला-त्या चित्राला हात लावू नका म्हणून.''

क्षण दोन क्षण शांततेत गेले. रवी गंभीरपणे पुन्हा बोलू लागला, ''पाहा, विचार करा. तुम्हाला असं अपघाती मरण आलेलं



चालेल? नाही तर असं करा; तुम्ही माझ्यासह ह्या कालकुपीत बसा. आपण भविष्यात उडून जाऊ. त्यामुळं तुमच्या वयाची फार तर ५-१० वर्षं वाढतील. पण तुम्ही जिवंत राहाल. असं मरण येण्यापेक्षा हे काय वाईट आहे? पाहा, मी तुम्हाला आयुष्य वाढवायची संधी देतोय.''

''नाही.'' आर्किमिडीज मिश्कीलपणे हसत म्हणाला, ''हे शक्य नाही अनोळखी माणसा. अरे, माझ्या राजाला युद्धात जर एवढी भरघोस मदत माझ्या हातून मिळणार असेल आणि माझ्या राजाचा जर माझ्या सेवेमुळं युद्धात जय होणार असेल, तर माझा मृत्यू समोर दिसत असला तरी बेहत्तर. मी राजासाठीच, माझ्या देशासाठीच बलिदान करीन. आयुष्याच्या समरंगणात पळपुटेपणा करून जगण्यानं काय हशील आहे? तू जा मी इथंच राहणार.''

कालकुपीचा दरवाजा उघडत रवी म्हणाला, ''मला दुःख होतंय की, मी तुमचं मन वळवू शकलो नाही.''

''दुःख करून घ्यायचं काही एक कारण नाही. माझ्या बुद्धिमत्तेच्या जोरावर जर माझ्या प्रिय राजाची मान साऱ्या जगात उंचावणार असेल, तर मी त्यासाठी हसत हसत मरणाऱ्या वेदीवर चढायला तयार होईन. जा. सुखी राहा.'' आर्किमिडीजनं निरोपाचा हात हलवला.

रवी कालकुपीत येऊन बसला. त्यानंही हात हलवला आणि कालकुपीचा दरवाजा बंद केला. तो विचार करू लागला की, आता कुठं जावं? बाविसाव्या की तेविसाव्या शतकात? की तिसाव्या? त्याला त्या भविष्यातील पुढारलेल्या लोकांच्या सौख्याचा क्षणकाल मोह पडला. कदाचित ते कालकुपीच्या जनकाचं उत्तम स्वागतही करतील. पण त्याला या क्षणीच आर्किमिडीजचं आत्मविश्वासानं दिलेलं उत्तर आठवलं. अन् त्यानं आपल्याच घरी जायचा निर्णय घेतला.

त्यानं संगणकावर आकडे फिरवले. कालकुपी सुरू करायचं बटण दाबलं. त्याला चक्कर आल्यासारखं वाटलं. सगळ्या वस्तू लहान होताना दिसू लागल्या. तेव्हा त्यानं डोळे मिटून घेतले. का कुणास ठाऊक त्या वेळेस त्याला आर्किमिडीजनं घाईगर्दीनं बंद

केलेल्या भेंडोळयातील त्या अर्धवट कामाचं चित्र त्याच्या मनःचक्षूंसमोर दिसू लागलं. तो त्या आकृड्यांचा, चिन्हांचा विचार करू लागला. अचानक त्याच्या लक्षात आलं की, ते चित्र होतं, प्राचीन काळातील पूर्णत्वास पोहोचलेल्या कालकुपीचं.

□ ■ □ ■ □

## मनकवडे!

अनुराधाची परीक्षा जवळ आली होती. तिच्यापुढं अभ्यासाचा प्रचंड डोंगर पडला होता. हा अभ्यास कसा करावा हेच तिला कळेनासं झालं होतं. काय काय अन् किती किती लक्षात ठेवायचं हा तिच्यापुढंचा प्रश्न होता. पुस्तकांच्या ढिगाऱ्यात ती नुसती बुडून गेली होती.

विचार करकरून तिच्या डोक्यातील मेंदूचा भुगा व्हायची वेळ आली. पहिला नंबर तर चुकवता येणार नव्हता. शेवटी कंटाळून तिनं पुस्तक मिटलं आणि ढिगाऱ्यातून बाहेर पडली. थेट पलंगाकडं गेली अन् तिनं झकासपैकी ताणून दिली.

पण झोपसुद्धा धड लागत नव्हती. परीक्षेचे विचार काही पाठ सोडत नव्हते. कधीतरी डुलकी लागायची झालं. तिला सतत वाटत होतं की, पाचवीचा अभ्यास जर एवढा आहे, तर पुढं दहावी, बारावी आणि कॉलेजचा अभ्यास किती असेल. मग आपलं कसं

होईल. आईबाबा तर आपल्याला पहिला नंबर कधीच सोडू नकोस म्हणणार. हे दडपणच तिला जास्त वाटत होतं.

''एवढा अभ्यास करायला आणि लक्षात ठेवायला काहीतरी सोपी युक्ती शोधली पाहिजे.'' अनुराधा स्वतःशीच म्हणाली, ''आज विज्ञान एवढं पुढं गेलंय... अगदी गगनाला गवसणी घालतंय तर कुणीतरी असं एखादं यंत्र का नाही शोधून काढत की, जे आपण वाचत असताना किंवा विचार करताना त्यांना सरळ शब्दरूप देईल. आणि ते शब्द केव्हाही आपल्याला पुनःपुन्हा वाचता येतील. म्हणजे एकदा डोक्यात गेलेले पुन्हा विसरायची भानगड नाही. खरंच असं उपकरण निघालं तर काय मजा येईल. मग सगळा अभ्यास एकदा त्या उपकरणात भरला की झालं. आपल्याला एखाद्या प्रश्नाचं उत्तर हवं असलं की त्या उपकरणाला आपल्यासमोर ठेवायचं. आपल्या प्रश्नाचा विचार सुरू करायचा की लगेच त्या प्रश्नाचं उत्तर उपकरणातून बाहेर पडणार, रेडीओवर नाही का आपल्याला हव्या त्या स्टेशनचा खटका दाबला की, हवा तो कार्यक्रम ऐकायला येतो-अगदी तस्संच. मग हा अभ्यास एकदम सोपा होऊन जाईल.''

असा काहीसा गमतीदार विचार करत असतानाच तिला झोप लागली. झोपेतही तिला चित्रविचित्र स्वप्नं पडत होती. आणि अचानक स्वप्नात परी आली; पांढराशुभ्र फ्रॉक घातलेली. गोरीगोरीपान. हवेतून तरंगल्यासारखी ती अनुराधाजवळ आली. हलक्याच मऊ आणि मधाळ आवाजात तिनं हाक मारली, ''अनुराधा, ये माझ्याबरोबर. तुला जे हवंय ना ते मी तुला देईन. तुला अभ्यास सोपं करणारं उपकरण हवंय ना? मग चल माझ्याबरोबर.''

अनुराधानं किलकिलं डोळे करून परीकडं पाहिलं. तो तिचा मऊ हात तिच्या गालावरून मोरपिसं फिरवल्यासारखा फिरत होता.

अनुराधानं विचारलं, ''खरंच तशा प्रकारचं उपकरण आहे तुझ्याकडं?''

''हो की. एवढंच नाही तर ते उपकरण लोकांच्या मनातले विचारसुद्धा ओळखून दाखवतं. अगं म्हणून तर मी तुझ्याकडं आले.''

''मग चल तर लवकर. माझा किती अभ्यास पडलाय. चल



ही पुस्तकं गोळा करते आणि आलेच हं.''

अनुराधानं मग दोन चार विषयांची पुस्तकं घेतली आणि निघाली परीबरोबर. परीचा हात हातात घेतल्यावर तीही अलगद हवेत तरंगायला लागली. काही क्षणात त्या दोघी एका भल्या मोठ्या इमारतीजवळ आल्या. ती एक भव्य अत्याधुनिक प्रयोगशाळा होती. मोठमोठ्या दालनात चित्रविचित्र उपकरणं दिसत होती. लाल, हिरवे, पिवळे, निळे दिवे उघडझाप करत होते. जणूकाही त्या उपकरणांचे लुकलुकणारे डोळेच. काही उपकरणांतून चूर्रऽऽऽ खर्र्रऽऽऽ लबढब असे आवाजही येत होते. तर काही उपकरणांच्या पडद्यावर आलेखासारख्या वरखाली रेघोट्या उठत होत्या. अनुराधा अनिमिष नेत्रांनी हे सर्व पाहत होती.

परीनं तिला मग एका दालनात नेलं. त्या दालनात पोहोचल्यावर परी म्हणाली, ''ही बघ तीच उपकरणं, ज्यांच्याविषयी तू विचार करीत होतीस.''

''अय्या खरंच.'' अनुराधाच्या चेहऱ्यावर आनंद मावत नव्हता.

ती त्या उपकरणांचं निरीक्षण करू लागली. काही उपकरणं मोठी-आपल्या टी. व्ही.एवढी तर काही अगदी छोटी-आपल्या हाताच्या पंजाएवढी; पण त्या सर्व उपकरणांवर टी. व्ही. सारखा पडदा होता आणि तीन वायरी होत्या. परी म्हणाली, ''चल, तुझं पुस्तक घेऊन उपकरणाजवळ उभी राहा आणि पाहा गम्मत'', असं म्हणत परीनं अनुराधाच्या डोक्यावर त्या तीन वायरी चिकटवल्या. एक पुढं, एक डोक्याच्या मध्यभागी व एक मागं.

''हं चल, कर सुरुवात.''

अनुराधानं हाताशी असलेलं पुस्तक उचललं अन् मनातल्या मनात वाचायला लागली. मग पुस्तक खाली ठेवलं व वाचलेल्या प्रश्नाचा विचार करू लागली. आणि काय आश्चर्य तिचे विचार जसेच्या तसे समोरच्या उपकरणावर शब्दरूप घेऊ लागले ते पाहून ती चाटच पडली.

''आहे खरं हे जादूचं उपकरण!''

''अगं, हे तर काहीच नाही. त्या उपकरणात तर अशी रचना आहे की, इथं बसल्या बसल्या तू कितीही अंतरावरच्या

माणसांच्या मनातले विचार ओळखू शकतेस. पाहायचंय?''

''चल पाहू या. मला माझ्या आवडत्या बाईंचं माझ्याविषयी काय मत आहे ते समजेल?''

''हो. तू फक्त त्या उपकरणासमोर उभं राहायचंस आणि तुझ्या बाईंची आकृती तुझ्या डोळ्यासमोर आणायची की, त्यातून काही क्षणात तुला पडद्यावर अक्षरं उमटलेली दिसतील.''

अनुराधा त्या उपकरणासमोर उभी राहिली. डोळे मिटून बाईंची मूर्ती समोर आणली. क्षणभरानं डोळे उघडले. आणि आधाशी नजरेनं पडद्याकडं पाहू लागली.

''ह्या अनुराधामुळंच माझ्या मुलीचा नंबर मागे जातो. ह्यावेळेस काहीही करून आपण तिला कमी मार्क द्यायचे. म्हणजे माझ्या तनुजाचे मार्क वाढतील आणि तिचाच पहिला नंबर येईल.''

पडद्यावरची ही अक्षर वाचून अनुराधाला बाईंचा अस्सा राग आला म्हणून सांगू. खरं तर ह्या बाई तिच्या किती आवडत्या होत्या. तिच्याशी किती छान वागायच्या. तनुजाला सारखं आपलं उदाहरण द्यायच्या. आपलं नेहमी कौतुक करायच्या, मनातून मात्र अशा असतील असं तिला कधीच वाटलं नव्हतं. तिचा चेहरा हिरमुसला झाला.

''अगं ए वेडाबाई, बघं तुझे आता चाललेले विचारही हे उपकरण दाखवतंय. आता आणखी कुणाच्या मनातले विचार ओळखायचेत?''

''अं...''

''अगं अशी थांबतेस काय? नाही तर निघू या का?''

''थांबा. आता आईच्या मनात काय विचार चाललेत ते पाहू या हं. आणि मग निघू.''

अनुराधानं डोळे मिटून आईची मूर्ती समोर आणली. डोळे उघडून मग ती पडद्याकडं पाहू लागली.

''माझ्या विशालसाठी आतापासून काहीतरी बघितलं पाहिजे. त्याच्या अभ्यासाकडं दुर्लक्ष होता कामा नये. अनुराधा हुशार आहे पण शेवटी ती काय मुलगीच. तेव्हा तिची हुशारी लग्नानंतर चूल आणि मूल सांभाळण्यापूर्तीच. विशाल मात्र आपली म्हातारपणची



काठी आहे. तेव्हा त्याच्याकडंच लक्ष दिलं पाहिजे.''

आईचे हे विचार ऐकून तर तिला रडूच कोसळलं. ती भोकांड पसरून जोरजोरानं रडायला लागली. आपण आईच्या नावडत्या आहोत असं तिला वाटायला लागलं.

तिच्या रडण्याचा आवाज ऐकून माजघरातनं आई धावत तिच्याकडं आली. आणि तिला जागे करत म्हणाली, ''अगं, अनुराधा काय झालं? रडतेस कशाला? झोपेत काही वाईट स्वप्न पडलं का?''

आईच्या हलवण्यानं ती जागी झाली. समोर आईला पाहिल्याबरोबर ती म्हणाली, ''जा तू तुझ्या विशाललाच जवळ घे. तो तुझा आवडता आहे ना?''

□ ■ □ ■ □

# लिलाव

''मला क्षमा कर पप्पू'' दुःखित चेहऱ्यानं रामसिंग त्याच्या खांद्यावर बसलेल्या आणि शेंगदाणे खात असलेल्या माकडाला – त्याच्या आवडत्या पप्पूला म्हणाला, ''मला हे केलंच पाहिजे.''

त्यावर माकडानं त्याचे कान टवकारले. रामसिंगाकडं टक लावून पाहिलं. त्याच्या कानाजवळ आपलं तोंड नेलं. जणू काही रामसिंगाशी त्याला काही हितगुज करायचं होतं.

घीना ग्रहावर रामसिंग आणि पप्पू पोहोचल्यावर तेथील एका हॉटेलमध्ये एका घीनियन (इंडिया-इंडियनप्रमाणं) व्यक्तीची वाट पाहात बसला होता. वातावरण उबदार होतं.

कुठलाही आवाज न करता हॉटेलचा दरवाजा उघडला गेला. दरवाजातून एक घीनियन व्यक्ती स्वागतकक्षाकडं गेली. त्याच्या हातात मण्यांची एक जपमाळ होती. स्वागतकक्षात असतानाच त्या व्यक्तीचं लक्ष रामसिंगकडं गेलं. त्याला पाहिल्यावर तो रामसिंगकडं



यायला निघाला. त्याच्या टेबलावरच समोरच्या खुर्चीवर बसला. जपमाळ टेबलावर ठेवली व ओळखीचं हास्य करून म्हणाला, ''घीना ग्रहावर तुमचं स्वागत असो. आत्ताच आलात काय?''

''होय आत्ताच. मालवाहू यानातून आलो.''

''हो, तुमची पहिलीच वेळ असेल नाही घीना ग्रहावर यायची? बरेच दिवस राहायच्या विचारानं आलात की लगेचच जाणार परत पृथ्वीवर?''

''तसं काहीच आत्ता मला सांगता यायचं नाही. पाहू या कसं काय घडतं ते?'' रामसिंग.

''हं.'' त्या घीनियन व्यक्तीच्या चेहऱ्यावर सदाच हास्याचा मुखवटा चढवला होता की काय कोण जाणे? ''हं, तर तुम्ही तुमचं नशीब अजमावायला आलाय तर! 'नशीब!' हा एक मनातील दुर्बोध असा गुंतागुंतीचा गंड आहे. प्रत्येकजण त्याच्यावर हवाला ठेवून जगत असतो. मला वाटतं, तुम्हाला या ग्रहावरील व्यापारी उलाढालीच्या आकर्षणानं खेचून आणलंय.''

रामसिंगनं कुठलीच प्रतिक्रिया व्यक्त केली नाही. त्याच्या खांद्यावरील माकड अजूनही शेंगदाणे खात होतं.

''अरे हो, माझं नाव पॅप.'' असं म्हणून पॅप पुढं बोलू लागला, ''मला असा विश्र्वास वाटतो, तुम्हाला काही फार मोठी खोली राहायला लागणार नाही.''

''हे बरोबर बोललात.'' रामसिंग.

''या विश्र्वाच्या आकाराच्या पार्श्वभूमीवर आपल्या राहण्याच्या खोलीचा लहानमोठेपणा म्हणजे समुद्राची अन् त्याच्या किनाऱ्यावरील वाळूच्या कणांशी तुलना करण्यासारखं आहे, नाही?''

पॅप तात्त्विक मूडमध्ये दिसत होता. पण रामसिंगला मात्र जोराची भूक लागली होती. त्याच्या पोटात खड्डा पडल्यासारखा झाला होता. चर्चा करण्याइतपतही त्याच्यात शक्ती राहिली नव्हती. एवढ्यात पप्पूनं शेंगाचं फोलपट पॅपच्या अंगावर भिरकावलं आणि नाक खाजवून आपली नाराजी व्यक्त केली, पण काही क्षणानंतर पुन्हा हसला.

''ओऽ सॉरी'' रामसिंगानं पप्पूच्या कृतीवर पॅपची क्षमा

मागितली.

''ठिकाय, फारसं मनावर घेऊ नका. पण हा कोणत्या प्रकारचा प्राणी आहे?'' कुतूहलानं पप्पूकडं निरखत पॅप म्हणाला.

''पृथ्वीवरील माकडांच्या जमातीतील आहे. आमचा पूर्वजच म्हणा ना.''

''फारच रंजक आहे हे.''

''मला... मला ह्या प्राण्याला विकायचा आहे. ह्याची विक्री करण्यासाठी मला कुठं जावं लागेल?'' रामसिंगनं निराशेनं विचारलं.

ती घीनियन व्यक्ती-पॅप टेबलावर वाकली अन् हळूच त्या माकडाला स्पर्श करून विचारलं, ''हा प्राणी काय करू शकतो. म्हणजे याचा उपयोग काय?''

त्यावर रामसिंगनं त्याला खांद्यावरून खाली उतरवून टेबलावर ठेवलं आणि पप्पूला काही कसरती दाखवण्यास फर्मावलं. पप्पूनं आज्ञापालन करून एका पायावर उभा राहून पॅपला नमस्कार केला.

''वाऽऽ, वा झकास'' पॅप आनंदित स्वरात म्हणाला.

''बरं आता झुकझुक गाडीचा आवाज करून दाखव.'' रामसिंगनं आज्ञा केली. पप्पूनं ती तंतोतंत पाळली.

''आता गरोदरबाईसारखं चालून दाखव.''

पप्पूनं तसं करून दाखवलं.

पप्पूनं रामसिंगसारखं बोलणं-चालणं करून दाखवलं.

''आता मरून जा.''

''पप्पू मेल्यासारखा टेबलावर आडवा पडला अन् ताठ झाला.

''पप्पू, हा समोरचा माणूस-घीनियन-दरवाजातून आत आला तेव्हा काय करत होता ते दाखव.''

पप्पूनं टेबलावर ठेवलेली जपमाळ घेतली व ती जप केल्यासारखी हातातून फिरवू लागला.

''बहोत खूब, बहोत खूब'' असं म्हणत पॅप जोरात हसू लागला. ''अरे हो, ही जपमाळही पृथ्वीवरचीच आहे बरं का.''

''खरंच'' रामसिंग माळेकडं पाहू लागला. पण पॅपचं लक्ष मात्र त्या विचित्र प्राण्यानं वेधलं होतं.



''फारच झकास, खूपच रंजक प्राणी आहे हा'' असं पॅप कुतूहलपूर्ण नेत्रांनी बोलत होता.

''ह्याला विकणं शक्य होईल ना मला?''

''नक्कीच'' पॅप त्वरित उत्तरला. ''पण आमच्या इथं व्यापार फक्त लिलाव पद्धतीनंच होतो आणि तोही दलालामार्फतच . तुम्हाला ह्या व्यवहारात चाळीस टक्के मिळतील.''

''काय? फक्त चाळीस टक्के?''

''हं. ही तशी काही लहान रक्कम होणार नाही. जर तुम्हाला मान्य असेल तर ह्या प्राण्याला द्या माझ्याकडे.''

रामसिंग क्षणभर विचार करून म्हणाला, ''ठिकाय.''

पप्पू अजूनही मण्यांची माळ हातात घेऊन ओढत होता. रामसिंगनं खिशातून शेंगा काढल्या व पप्पूच्या पुढं धरल्या. पप्पूनं मण्यांची माळ फेकून दिली आणि त्याच्या मालकाच्या हातातून शेंगा हिसकावून घेतल्या. रामसिंग ह्या कृतीवर हसला. त्याचं हे हसणं या ग्रहावर पोचल्यानंतरचं पहिलंच व शेवटचं ठरणार आहे हे त्या वेळेस त्याला ठाऊकही नव्हतं.

''मी आणि पप्पू फार जुने मित्र आहोत.'' रामसिंग गंभीर आवाजात म्हणाला. त्यावर त्याचं म्हणणं कळलं असा चेहरा पॅननं करून त्याला सहानुभूती दाखवली. रामसिंगच्या हातात पॅप खोलीची चावी देत असताना रामसिंगनं जरा चाचरतच विचारलं, ''मला काही खायला मिळेल? तुम्हाला मग मी माझ्या चाळीस टक्क्यांतून ती रक्कम परत करीन.''

''नाही, नाही. आज तर तुम्ही माझे पाहुणे आहात. तेव्हा तुम्हाला मीच पाहुणचार देणार आहे.'' असं म्हणून पॅपनं जेवणाची ऑर्डर दिली.

जेवण झाल्यावर पॅपनं त्याला सांगितलं, ''आता आपल्या खोलीत जाऊन स्वस्थ पडा. लिलावाच्या वेळी मी तुम्हाला घ्यायला येईन.'' रामसिंग खोलीकडं वळला तसा पप्पूही त्याच्या खांद्यावर बसला.

''नाय पप्पू. तू इथंच राहणार आहेस.'' असं म्हणून त्याला थोपटत रामसिंगनं टेबलावर ठेवलं पण त्या अश्राप जीवाला हा

दुरावा नकोसा होता. म्हणून त्यानं रामसिंगाच्या शर्टाला धरून ठेवलं.

मग रामसिंगनं त्याला आज्ञा केली, 'मरून जा' आणि आज्ञाधारकपणे पप्पू टेबलावर मेल्यासारखा आडवा पडला. ''तुम्ही एखादा मोठा खोका आणू शकाल काय?'' रामसिंगनं पॅपला विनंती केली. काही मिनिटांत त्यानं खोका आणला. त्याचं झाकण उघडून पप्पूला तशाच अवस्थेत त्या धातूच्या खोक्यात ठेवलं. त्याच्या शेजारी शेंगदाणेही टाकले आणि झटकन तो आपल्या खोलीकडं वळला. जाताना त्यानं डोळ्यांतून ओघळणारी आसवं मोठ्या कष्टानं टाळली.

दुसऱ्या दिवशी पॅपनं, रामसिंगला लिलावाच्या जागी नेलं. ''ह्या ठिकाणाहून तुम्ही लिलाव चांगल्या रीतीनं पाहू शकाल'', असं म्हणून त्यानं रामसिंगला एका संगणकाजवळ नेलं. त्या संगणकाशेजारीच एक प्रकाशित पडदाही होता. ''इतर बोली करणारेही अशाच संगणकासमोर बसले आहेत.'' असं म्हणून तो त्या खोलीबाहेर पडला. रामसिंग खुर्चीवर रेलून बसला.

सुरुवातीला पडद्यावर रामसिंगला कालचा परिचित खोका दिसला. त्या खोक्यातील माकडही रामसिंगला आता स्पष्ट दिसू लागलं होतं. त्याला आश्चर्य वाटत राहिलं की, या धातूच्या खोक्यातील वस्तूही कशा दिसू शकतात म्हणून.

''प्रिय घीनियन व्यापारीजनांनो,'' रामसिंगला पॅपचा आवाज ऐकू येऊ लागला, ''आज तुमच्यासमोर एका अद्वितीय प्राण्याचा-जो पृथ्वी ग्रहावरील आहे त्याचा-लिलाव केला जाणार आहे. तुम्हाला माहीत आहेच की, या विश्वातील प्राण्यांचा किती झपाट्याने ऱ्हास होतोय. ह्या ऱ्हासप्रक्रियेत सापडलेला पृथ्वीवरील हा प्राणी आपल्याला ह्या खोक्यात दिसतोय. ह्या प्राण्याची जमात आहे-माकड. पृथ्वीवरील लोक ह्यांना माकड म्हणून संबोधतात. हा तेथील सर्वांत हुशार प्राणी गणला जातो. हा आपली करमणूक इतक्या चांगल्या प्रकारे करू शकतो की, त्याचा आपल्याला कधीही कंटाळा येत नाही, हा माझा अनुभव आहे. एवढं कशाला, आत्ताच तो तुम्हाला काही करमणुकीचे कार्यक्रम करून दाखवील.''

पॅपनं झाकण उघडलं नि पप्पू उडी मारून बाहेर आला.



त्या वेळेसही तो शेंगदाणे खात होता.

''तर,'' पॅप बोलतच होता, ''हा आता काही रूपांतर तुम्हाला करून दाखवील की जी पाहून तुम्ही आश्चर्यचकितच व्हाल असे नाही, तर तुम्ही स्वतःलाही या करामतीत विसरून जाल.''

पॅपचं एवढं बोलणं होतंय न् होतंय तोच पडद्यावर दिसणारं ते माकड नाहीसं झालं. जणू काही वातावरणात विरघळलं. क्षणभरात त्या ठिकाणी पृथ्वीवरील एक सौंदर्यवती दिसू लागली. ती आपल्या गळ्यात मोत्याचा सर अडकवण्यासाठी दोन्ही हात मानेकडं नेऊन उभी होती.

रामसिंगनं त्याचा श्वास रोखून धरला होता. त्याला वाटलं होतं की, पप्पू आपल्या नेहमीच्याच कसरती करील. पण हे-हे काहीतरी वेगळंच करत होता. त्याला आठवलं की, कुणीतरी घीना ग्रहावरील एक शेरा मारला होता- ''घीना ग्रहावर कोणत्याही प्रकारच्या वैचित्र्यपूर्ण घटना घडू शकतात. त्या पाहून आश्चर्य वाटू देऊ नका.'' पण समोरच्या दृश्यावर रामसिंगचा विश्वास बसत नव्हता.

ती सौंदर्यवती एवढ्या मुलायमपणं हसली की प्रेक्षक घायाळच झाले. तिनं केसांवरून हात फिरवला आणि अशी हालचाल केली की, तिचा मारकपणा उठून दिसावा. ती टाटा करत असताना दुसऱ्या क्षणीच नाहीशी झाली. परत पडद्यावर माकड दिसू लागलं.

त्यानंतर माकडाचं रूपांतर टाईपरायटरमध्ये झालं की ज्यात अर्धवट टाइप करून पेपर तसाच पडला होता. नंतर त्याचं एक पेरूचं झाड झालं. ज्यावर अनेक पेरू लटकत होते. नंतर एका योद्ध्यात, तर लगेचच अजगरात, अशी रूपांतरं लोकांना पडद्यावर दिसू लागली. सगळी माणसं पुतळ्याप्रमाणं निश्चल होऊन पडद्याकडं विस्मयचकित नजरेनं पाहात होती.

''मित्रहो, नीट लक्षात ठेवा,'' पॅपचा आवाज एकाएकी घुमू लागला, ''हे माकड फक्त पृथ्वीवर पाहिलेल्या वस्तूंमध्येच रूपांतरित होऊ शकतं. तसं पाहता वैचित्र्य आणि रूपांतर ही काही आपल्या घीनियन्सना नवीन गोष्ट नाही. पण पुढं काय घडणार आहे ह्याची कल्पना नसलेली आणि आपल्याला संपूर्णपणे नवीन वाटणारी

रूपांतरं हीच ह्या प्राण्याची खासियत आहे. तुम्ही ह्या घटना पाहून उद्दीपित झालेले मला दिसताहात. आता तुम्हीच सांगा? याचं रूपांतर कशात व्हावं असं तुम्हाला वाटतं?''

''पॉच'' एक आवाज आला. (पॉच हे घीना ग्रहावरील विशिष्ट प्रकारच्या वनस्पतीचं कंदमूळ आहे.)

''पॉच हे पृथ्वीवर होत नाही. तरीपण तुम्ही त्याचं वर्णन करा.'' पॅपनं सूचना केली.

डोकं खाजवत ती व्यक्ती म्हणाली, '' ते लालसर गोल असतं. थोडंसं आंबट लागतं.'' ती व्यक्ती आणखी काही बोलणार इतक्यात पप्पूचं रूपांतर टोमॅटोच्या झाडात झालं. ज्यावर अनेक टोमॅटो लगडले होते. त्यातले काही पॅपने तोडून लोकांना खायला दिले. पुन्हा पडद्यावर माकड दिसू लागलं.

''तर असा हा मन रिझवणारा पृथ्वीवरील प्राणी तुम्हाला विकत घ्यायची इच्छा झालीच असेल. ह्या प्राण्यातील अनेक खुब्याही तुम्ही पाहिल्यात. त्याचं रूपांतर बाईतही होऊ शकतं हेही तुम्ही पाहिलंत.'' असं म्हणून तो गालातल्या गालात हसला. पण सर्वांना त्याचा मथितार्थ जाणवला.

''बोला ह्या प्राण्याचा मालक होण्याची इच्छा आहे? बोली करा. बोली करा.'' पॅप हे बोलत असताना पडद्यावर वीस आकडा दिसला.

''काय? फक्त वीस-वीसच?'' अत्यंत तुच्छतेनं पॅप बोलला.

पडद्यावर मग चाळीस आकडा दिसू लागला. ''हं, चाळीस'' निरुत्साही आवाजात पॅप म्हणाला.

''पन्नास''

''सत्तर''

''ऐंशी''

''शंभर''

पडद्यावरील आकडे भराभर बदलत होते. रामसिंगला आता आपल्या मनावर ताबा ठेवणं कठीण जात होतं. त्यानं खुर्चीच्या दोन्ही हातांवर आपल्या मुठी घट्टपणे आवळून धरल्या. तो पडद्याकडं वेड्यासारखा पाहात राहिला.



''मित्रांनो, एकशे चाळीसची ही दुसरी बोली करत आहे.''

पॅप पुढं काही बोलेल इतक्यात पडद्यावर एकशे पन्नासचा आकडा झळकला. रामसिंगची बोटं त्याच्या समोरील संगणकावर नकळत फिरली होती.

''एकशे सत्तर''

''माझ्या लाडक्या! काय चाललंय हे?'' असा विचार रामसिंगच्या मनात आला. त्यानं संगणकावर पुन्हा बोटं फिरवली.

''एकशे ऐंशी.'' पडद्यावर आकडा झळकला.

''दोनशे.''

''अरे देवा! आता पप्पू कुठल्याही क्षणी दुसऱ्याचा होईल. कुणीतरी घीनियन त्याचा मालक होईल.'' रामसिंगचा भावनावेग इतका अनावर झाला की, त्यानं दोनशे पन्नास आकड्यावरून बोटं फिरवली.

''वा, दोनशे पन्नास! आपल्या घीनियन्सना खरोखरच वस्तूची योग्य किंमत करता येते.'' आनंदित स्वरात पॅप म्हणाला. त्याचं बोलणं संपायच्या आतच पडद्यावर 'तीनशे'चा आकडा दिसला.

''मला वाटतं, आता तुम्ही या प्राण्याची खरी किंमत करायला सुरुवात केलीय.'' पॅप म्हणाला.

''तीनशे सत्तर.''

''अरे रामा, हे घीनियन्स नक्कीच त्याला घेणार'' रामसिंगनं मनातल्या मनात पुटपुटत ''चारशे'' आकड्यावरून बोटं फिरवली.

''चारशे.'' पडदा झळकू लागला.

आता पडद्यावरील आकडे एवढ्या वेगानं बदलू लागले की, पॅपला बोली करायचीही उसंत मिळू शकली नाही.

शेवटी आकडा सातशेवर स्थिरावला.

''सातशे.'' पडदा जणू काही विश्रांती घेत होता. एखाद्या घीनियनला तो अगदी हवाच होता, असं पॅपला वाटायला लागलं. त्याला माहीत नव्हतं की रामसिंगच आकडे वाढवतोय. माकडाचं रूपांतर आता मोठ्या घड्याळात झालं होतं.

हे रूपांतर पाहून एका घीनियननं आकडा दिला.

''आठशे.''

रामसिंगचा तो आकडा पाहून ताबा सुटला.

''एक हजार'' पडद्यावर आकडा झळकू लागला.

''एक हजार?'' आता पॅपची आश्चर्यचकित व्हायची पाळी होती. त्यानं ह्या आकड्याची बोली करण्याऐवजी प्रश्नच विचारला.

पुन्हा विचारलं.

आणि पुन्हा विचारलं.

आता हा प्राणी एक हजाराला विकला गेला होता. ''मी ह्या प्राण्याला आता त्याच्या मालकाकडं द्यायची व्यवस्था करण्यास माझ्या सहकाऱ्याला सांगतो.'' पॅपनं असं म्हटलं. आणि पडद्यावरील चित्र नाहीसं झालं. पडदा पांढरा फटफटीत झाला.

रामसिंग बाहेर पडला. पप्पूजवळ गेला. पप्पूनं त्याला पाहिल्याबरोबर त्याच्या खांद्यावर उडी मारली. रामसिंग त्याला कुरवाळू लागला. त्याचे पटापट मुके घेऊ लागला. त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहत होत्या. तो त्याला घेऊन चालू लागला.

''थांबा, तुम्ही अजून ह्याची किंमत दिलेली नाहीय.'' मागून रामसिंगला पॅपचा आवाज आला. तो आवाज ऐकून रामसिंग पळू लागला. तो त्या धीना ग्रहावरील गावातील अनेक अनभिज्ञ गल्लीबोळांतून पॅपच्या हातून निसटण्यासाठी सैरभैर पळत होता. शेवटी एका टेकडीच्या पायथ्याला, एका झाडाखाली थकून बसला. पप्पूला त्यानं खांद्यावरून खाली ठेवलं. क्षणभर विश्रांती घेतल्यावर त्याला पप्पूचं पहिलं रूपांतर आठवलं...ती सौंदर्यवती. त्यानं पप्पूला सौंदर्यवतीत रूपांतरित होण्याची आज्ञा केली. पण पप्पूनं तिकडं लक्षच दिलं नाही. तो जपमाळेतील मणी कुरतडू लागला. पप्पूला त्यानं आपल्या समोर उभं केलं अन् म्हणाला, ''पप्पू, प्लीज, त्या बाईत रूपांतरित हो ना.''

''तुम्ही तुमचा वेळ फुकट घालवताय. तुम्हाला हवंय ते पप्पू देणार नाही.'' दचकून रामसिंगनं मागं वळून पाहिलं. पॅप व दोन पोलीस त्याच्या समोर उभे होते.

''तुम्ही स्वतःचंच माकड विकत घेतलंय.'' पॅप बोलू लागला, 'तुम्हाला त्याचे पैसे दिलेच पाहिजेत. तुमच्या भावना स्पष्ट करण्यात वेळ घालवू नका. मी काही त्यांचा बांधील नाही. मला



माझ्या व्यवहाराशी मतलब. आणि हो, एक लक्षात ठेवा. इथं एकदा विकलेली वस्तू, पुन्हा परत घेतली जात नाही. तेव्हा व्यवहारातील तुमचे चाळीस टक्के कापून हजारातील सहाशे मला द्या.'' अत्यंत शुष्कपणे पॅप म्हणाला.

रामसिंगनं चवताळून त्याच्या शर्टाची कॉलर पकडली. पण पोलिसांचे दोन हात त्याच्या खांद्यावर एवढ्या जोरानं पडले की, त्याला वाटलं, आपले खांदे लुळे पडले आहेत.

''खोटारडा, नालायक'' क्रोधानं लाल-पिवळा होत रामसिंग ओरडला.

पॅपनं हळुवारपणे आपली कॉलर रामसिंगाकडून सोडवून घेतली आणि निर्विकारपणे म्हणाला, ''एक लक्षात असू द्या. तुमच्याच म्हणण्यावरून हा व्यवहार ठरला होता. आम्ही कुणालाही फसवलं नाहीय पाहा'', असं म्हणून पॅपनं माकडाचं रूपांतर बाईत केलं. त्या बाईनं मघासारखी हालचाल केली व पुन्हा त्या बाईचं पप्पूत रूपांतर झालं.

''पुन्हा एकदा'' रामसिंग म्हणाला.

''पुन्हा एकदा'' आता रामसिंग ओरडला.

''बस आता पुरे'' पॅप कमालीच्या शांतपणे म्हणाला. पॅप लक्ष देत नाहीय हे पाहून त्यानं पप्पूकडं वळून आज्ञा केली. ''पप्पू बाईत रूपांतरित हो.'' पण पप्पू कसला ऐकतोय. तो ढिम्म. जागेवरून हलेना की त्याचं रूपांतर होईना. आपली आज्ञा पप्पू ऐकत नाही, हे पाहून रामसिंगला राग आला. त्यानं पप्पूच्या पेकाटात एक लाथ हाणली. पप्पू 'ची, ची' केकाटत दूरवर फेकला गेला. त्याला कळेना आपला प्रेमळ मालक असा का वागतोय? रामसिंगनं मग त्या दिशेनं दगड भिरकवायला सुरुवात केली. माकड ते चुकविण्यासाठी लांब पळाले.

पोलिसांनी रामसिंगच्या हातात हातकड्या अडकवल्या. मग ते सर्व टेकडीच्या शिखराच्या दिशेनं चढू लागले. शिखरावर पोहोचल्यावर ''बरोबर सहाशे दिवस तुम्हाला असं काम करावं लागेल.'' पॅपनं खालच्या दिशेकडं बोट दर्शवीत म्हटलं. तिथं माणसं दगड फोडत होती, तर काही जमीन सपाट करीत होती.

त्यांच्यातील एकजण वर आला अन् रामसिंगच्या हातात कुदळ देऊन म्हणाला, ''चला.''

रामसिंगला कळलं की, आपण आता यांचे कैदी झालो आहोत. कुठल्याही प्रकारचा आततायीपणा करण्यात वा प्रश्न विचारण्यात काही अर्थ नाहीय. समजूतदारपणे कुदळ हातात घेतली व त्या माणसाबरोबर टेकडी उतरू लागला. त्याच्या पाठीवर थाप मारून तो माणूस म्हणाला, ''चला.''

''बरोबर सहाशे एकव्या दिवशी तुला पृथ्वीवर पाठविण्यात येईल. तोपर्यंत बाय'' पॅप म्हणाला.

''थांबा'' रामसिंग मागे वळून पॅपला म्हणाला.

पॅपनं प्रश्नार्थक मुद्रा करून विचारलं, ''आता काय आहे?''

''ह्या घीना ग्रहावर दिवस किती तासांचा असतो?'' ह्या प्रश्नावर पॅपनं काहीएक उत्तर न देता छदमी हास्य केलं आणि मागे वळून चालता झाला.

रामसिंग खाली मान घालून टेकडी उतरू लागला. तेवढ्यात पप्पू त्याच्या खांद्यावर येऊन बसला. त्यानं आपल्या मालकाला माफ केलं होतं.

❑ ■ ❑ ■ ❑